# निर्मिती...

## ( दीर्घांक.)

**-- चं.प्र. देशपांडे.**

प्रसंग आणि शब्द वाटतात त्याहून वेगळेच असतात...
या वेगळेपणातच इथल्या निर्मितीची बीजं असतात...
निर्मितीदेवतेचा प्रसाद असणाऱ्या व्यक्तीच्या अंगावर कुठेही एक हिरवे चक्र उमटते. राज्यातल्या महत्त्वाच्या सर्व घटना या अशा व्यक्तींमुळे आणि या व्यक्तींमध्येच घडतात. अशा पाच व्यक्ती असताना सुरू होते ही कहाणी.

( प्रथम निर्मितीदेवतेच्या मूर्तीवर प्रकाश. या नाटकातली पाच पात्रे निरनिराळे मुखवटे घालून येतात. आळीपाळीनं खालील वाक्यं म्हणतात. हे प्रास्ताविक संपल्यावर जातात. )

ही निर्मितीदेवता. या राज्यातील सर्व निर्मिती हिच्या इच्छेनं होते असं म्हणतात. माणसांच्या इच्छेतून खरं तर ही निर्माण झाली. आणि नंतर संपुर्ण आयुष्याचं अधिष्ठान होऊन बसली. हिच्याच प्रभावातून आयुष्यं नियंत्रित होऊ लागली.

आता इथं, खरं तर, हिचंच राज्य चालू असतं. घटना घडत असतात. काही वेळी आपण अमुक एका परिस्थितीत आहोत असं माणसं समजत असतात आणि वस्तुतः परिस्थिती वेगळीच असते.

हे लक्षात येईपर्यंत बराच काळ लोटलेला असतो. माणसं अचानक बदलतात -- वेगळे पवित्रे घेतात. संघर्ष होतात. वरवर दिसणारं खरं नसतंच काही. वरवर सरळ, साध्या दिसणाऱ्या गोष्टी एखाद्या भयानक टोकाकडे नेत असतात. वरवर कंटाळवाण्या दिसणाऱ्या गोष्टींतून एखादा खूनही आकाराला येत असतो. आयुष्यात खुनाची बीजं पडताहेत हे त्या वेळी लक्षातही येत नसतं.

या राज्यातली निर्मिती म्हणजे केवळ एक बदल असतो. पुन्हा एखाद्या बदलाची अपेक्षा ठेवणारा बदल. आणि असा बदल हा विनाशकच असू शकतो. निर्मितीला याहून वेगळा अर्थ राहातच नाही...

काय काय घडलं असेल आणि काय काय घडणार असेल यांचे अंदाज एखाद्या क्षणातच साकळून आलेले नसताना...सुरुवात होते या कहाणीची...वातावरणातली भयानकता फक्त दबा धरून असते... आणि मग एकच क्षण असा येतो की, घडून गेलेल्या गोष्टींचे वेगळेच अर्थ दिसायला लागतात.

( समोर सिंहासन किंवा उंची खुर्ची -- उंचवट्यावर. उंचवट्याला काही पायऱ्या. डाव्या हाताला निर्मितीदेवतेची मूर्ती - या मूर्तीला चेहऱ्याचे तपशील नसावेत आणि ही स्त्री-देवता आहे की, पुरुष-देवता आहे ते निश्चित करू नये. मूर्ती काळ्या रंगाची आणि भूमिती-आकारात असावी. उजव्या हाताला एक छोटा पादचारी-पूल - हा परीघपूल एखाद्या बागेतलाही असू शकेल. त्या पुलाच्या पुढच्या भागात दोन-तीन खुर्च्या आणि स्टूल. डाव्या हाताला एक टेबल आणि भोवती खुर्च्या. आता समोर पुलावर जय -- वय २८ -- आणि नील -- वय २५. या नाटकात सर्व पात्रांचे पोषाख पुरुषी. आवश्यक तेव्हा सेक्शनल-प्रकाशयोजना. परंतु प्रत्येक वेळी अंधार-उजेड हे तंत्र वापरू नये. सुरुवातीला पुलाच्या भागावर प्रकाश. जय आणि नील शेंगा खात उभे आहेत. जयच्या हातात शेंगांचा पुडा.टरफले खाली टाकत पुढील संवाद--)

नीलः स्त्रीच विजयी झाली शेवटी. सफल झाली माझी प्रार्थना. उचंबळून येतं आहे आज माझं स्त्रीत्व.

जयः फार उत्तेजित होऊ नकोस. आपण फक्त निवडीला साह्यभूत होणारे. आपलं ते कार्य संपल्यानंतर

सत्तास्पर्धेचे ताण सोडायला हवेत आपण. आपल्या मर्यादेच्या पुढे धावणारं मन आवरणंच शहाणपणाचं ठरेल.

नीलः माझी आवडती बीन होतेय आज सम्राज्ञी या राज्याची. पुरुषपक्ष पराभूत झाला असला तरी, सर्वांनीच साजरा केला पाहिजे हा आनंद. सर्वांच्या अपेक्षांची आणि मतांची किंमत ठेवणारं हे आपलं अमूल्य राज्य सत्ताधारी व्यक्तीच्या निवडीनंतर संघर्षहीन राहिलं पाहिजे. बीन आपणा सर्वांची नेती आहे. उद्या पुरुषपक्ष विजयी झाला तरी, माझी ही भूमिका बदलणार नाही.

जयः आपण आपलं काम केलं. अनुभवातून घडलेलं आपलं व्यक्तित्व, अपेक्षा आणि स्वार्थ यांना जागून आपण प्रामाणिक राहिलो. यापुढे आता मला यात अधिक रस घेण्याची इच्छा नाही. माझी प्रेयसी आहेस तू नील, सत्तेच्या या खेळात वाहवून जाऊ नकोस.

नीलः जय, माझ्या स्वभावाचं मला बंधन राहणारच. माझं मन हे तुझ्या मनाहून वेगळंच राहणार. आणि तरीही आपलं प्रेम आहे एकमेकांवर. एकमेकांना समजून घेत राहावंच लागेल आपल्याला. बीन विजयी झाली याचा मला आनंद झालेलाच आहे, आणि तो लपवता येणार नाही मला.

जयः ठीक आहे नील. पण सत्तेच्या खेळातल्या असंख्य शक्ती कुठून कोणत्या दिशांनी कशा वागतील याचा तंतोतंत अंदाज कधीच करता येत नाही. मला नुसता त्या शक्तींचा भाग होऊन जगायचं नाही. तुझं स्वातंत्र्य अर्थात मी नाकारलेलं नाहीच.

नीलः तू नेहमीच अनावश्यक सावध राहतोस. स्वतःचं वेगळेपण सतत जपतोस.

जयः ठीक आहे. आपल्यात वाद नको. आज बीन, उद्या आणखी कुणी. आपले संबंध अधिक टिकाऊ आणि महत्त्वाचे.

नीलः लैंगिक संबंधांव्यतिरिक्त दुसऱ्या कुठल्याही बाबतीत बेभान झालेला पाहायचं आहे मला तुला.

जयः ( टरफले आणि कागद टाकून-- ) हं, चला.( दोघेही जातात. यानंतर प्रकाशमान जागेतून शेट-- वय ३५ -- हा नपुंसक आहे -- हातात फुलांचा गुच्छ घेऊन उजवीकडून डावीकडे जातो. नंतर उजव्या बाजूच्या खुर्च्या-स्टूल या दृश्यावर प्रकाश. नाथ-- वय ३५ -- येतो. हातात दारूची बाटली आणि ग्लास. बसतो. ग्लासात दारू ओतत -- पीत -- )

नाथः ठीक आहे...ठीक आहे... पराभव... ठीक आहे... शेवटी शेवटचा डाव यशस्वी ठरला तिचा...पुरुष व्हायचंय त्या षंढाला... पुरुष व्हायचंय...ठीक आहे... हाच डाव उलटवल्याशिवाय मी राहणार नाही... शेवटी मी विरोधक आहे...विरोधक... तोफा डागतच राहीन मी... प्रश्न, स्पष्टीकरणं, समर्थनं यांच्या गुंत्यात खलास करत राहीन मी तिला... पराभव... आज पराभूत आहे मी...पण... पण हाही शेवट नाही... निर्मितीदेवता आहे तोपर्यंत डावपेचांच्या प्रार्थना चालूच राहतील...मीही संधीची वाट पाहात राहीन...वाट पाहात राहीन...एक दिवस असा येईल... असा येईल...( खुनशी नजर... हे दृश्य इथे संपते.पुढील दृश्यात सिंहासनावर प्रकाश. राज्यारोहणाचे प्रचंड धडाकेबाज संगीत. गर्दीचा आवाज. बीन प्रवेश करते. चालीत अधिकारपदाचा दिमाख आणि वजन. सस्मित मुद्रेने हात उंचावून लोकांच्या उत्साहाचा स्वीकार करते. तिच्या डाव्या दंडाला अधिकारपदाचे रंगीबेरंगी वस्त्र. काही क्षणांनी ती सिंहासनाकडे जाण्यासाठी पायऱ्या चढू लागते. पण एका पायरीवर तिला किंचित ठेच लागून पाय अडखळतो. ती वळते. लोकांना उद्देशून ---)

बीनः हा अपशकून समजू नका. राज्यारोहणाच्या क्षणी पाय अडावा, एक किंचित् ठेच लागावी ही निर्मितीदेवतेचीच योजना असणार. या एका छोट्या घटनेनं जाग्या केल्या आहेत तिनं असंख्य जाणिवा माझ्या मनात. देवतेचा मला कधीच विसर पडून चालणार नाही. खरी सत्ता तिचीच आहे. मी फक्त प्रतिनिधी आहे. राज्यकर्ते तुम्हीच आहात.आता मी तुम्हा सर्वांची प्रतिनिधी आहे. मला पाठिंबा देणाऱ्यांची आणि विरोधकांचीही. माझ्या शक्ती-समजुतीतून तुमचे-आपले सर्वांचे हित हा एकच हेतू राहील.सार्वत्रिक न्याय हे एकच धोरण राहील. माझ्या आयुष्यात तात्पुरती गोष्ट राहील हे सिंहासन. आपणा सर्वांच्या इच्छा, आकांक्षा हीच माझी दिशा राहील-भेदभावातीत-जोवर मी इथे आहे तोवर... (टाळ्यांचा कडकडाट. पुन्हा संगीत. बीन वळते आणि उरलेल्या पायऱ्या चढून सिंहासनापन्न होते. संगीत प्रचंड वेग घेऊन एकदम थांबते. तोफांची सलामी. डाव्या बाजूने शेट पुष्पगुच्छ घेऊन येतो. उजव्या बाजूने पुलावरून येऊन जय आणि नील लांब उभे असल्याप्रमाणे समारंभ पाहत उभे. शेट सुहास्यवदनाने जाऊन बीनला पुष्पगुच्छ अर्पण करतो. टाळ्यांच्या कडकडाट, जय आणि नीलही टाळ्या वाजवतात. शेट

पुन्हा येऊन खाली उभा राहतो. काही क्षणांनी बीन उभी राहते. पुष्पगुच्छ सिंहासनावर ठेवते. मग --)

बीन : मी अधिकारपदाची सूत्रं हाती घेतली आहेत.( जरा वेळ टाळ्या ) फुलं दिलीत तुम्ही मला. मी ती सिंहासनाला अर्पण केली आहेत.(टाळ्या.) माणसांना अंत असतो. सिंहासन आणि देवता यांना अंत नसतो. आता आपण निर्मितीदेवतेची प्रार्थना करू. जे होईल ते तिच्या इच्छेनंच होईल.( पायऱ्या उतरून निर्मितीदेवतेच्या मूर्तीसमोर येते. अभिवादन करून उभी राहते. काही क्षण शांतता.) तुम्हा सर्वांच्या इच्छेनंच ही संधी मिळाली मला. तुमच्या या इच्छा तेवत्या राहतील असं कार्य माझ्या हातून घडत राहो हीच माझी प्रार्थना.( टाळ्या.) मानवी संबंध गुंतागुंतीचे असतात. अधिकारपदावरून हा गुंता हाताळावा लागेलच. डाव-प्रतिडाव, प्रेम, सक्ती सगळंच होईल. जे होईल ते देवतेच्या इच्छेनं होईल. माझ्या हाती हे अधिकार सोपवण्यात तुम्ही चुकीचा लवलेशही नसलेली कृती केली आहे. आपणा सर्वांचं सुख हा एकच माझा हेतू आहे; राहील. जय तेजराज्य ! जय निर्मितीदेवता !! ( जरा वेळ टाळ्या. आता समारंभ संपलेला.  बीन फुले हातात घेते. हुंगते. तो गुच्छ उंच धरून अभिनंदनाचा स्वीकार करीत जाते. जय, नील आणि शेटही जातात.

इथे समूहाच्या आवाजात राष्ट्रगीत :--

तेजराज्य तेजराज्य
प्रेमराज्य प्रेमराज्य   !!
उंच वृक्ष,रुंद नद्या
पशुपक्षी, नरमाद्या
आकाशी विविध रंग
पर्वतराजी अभंग
जय हे संपन्न राज्य
तेजराज्य तेजराज्य
प्रेमराज्य प्रेमराज्य   !!

नाथ अजून दारू पीत बसलेला.)

नाथः तोफेच्या प्रत्येक आवाजानं चिंध्या होताहेत माझ्या. तुकडे होताहेत माझे. माझे सर्व तुकडे एकत्र होऊन उभा राहीन मी पुन्हा -- जेव्हा याच तोफेचा प्रत्येक  आवाज माझ्यासाठी असेल. बीन आज हसते आहे...यशस्वी झाली आहे म्हणून हसते आहे... हसणाऱ्या व्यक्ती निःस्वार्थी, निःस्पृह वाटतात. हा आयुष्यातला सर्वात मोठा धोका आहे...हा भ्रम,हा धोका--दूर करणं हेच आता माझं काम आहे...बीनच्या पकडीतून हे आमचं तेजराज्य मुक्त करणं हा एकच ध्यास राहील मला... आज मी पराभूत आहे, उद्या विजयी होईन...जे होईल ते देवतेच्या इच्छेनंच होईल...(ग्लास संपवून उठत---) कोणते डाव कसे उलटवले पाहिजेत, कोणत्या डावपेचांची आवश्यकता आहे याचा अंदाज आला आहे मला...(तोल सावरत जाऊ लागत--) अंदाज आला आहे...( जातो. इथे जरा वेळ उत्कंठावर्धक संगीत--आताच्या दृश्यात डाव्या बाजूला असलेल्या खुर्च्यांवर बीन आणि नील.)

बीनः माणसं खूप आहेत राज्यात. त्यांचे अनेक प्रश्न आहेत. माझ्याकडून काय अपेक्षा आहेत हे माहीत आहे मला. पण नील, तुम्ही माझे पाठीराखे. मला शक्ती पुरवणारे आहात. या शक्तीमुळंच झाल्या तर काही गोष्टी साध्य होतील.

नीलः उलट तुझ्याजवळ नेतृत्वाचे मोठे गुण आहेत, म्हणूनच मोठ्या अपेक्षांनी आम्ही तुझ्याबरोबर आहोत. सत्यासत्य, चांगलं-वाईट हे माणसंच ठरवतात--आम्हाला हितकारक वाटणाऱ्या गोष्टींतून हे ठरतं. त्यामुळं आमचा तुला पाठिंबा हा आमचा आम्हालाच पाठिंबा असतो.

बीनः तुमच्यात एक स्वच्छ खरेपणा आहे नील. याला धक्का न लावता सगळं पार पडू शकलं तर किती बरं होईल !

नीलः असं का म्हणतेस तू बीन ?

बीनः नेतृत्व स्वीकारताना,नील, पहिली जर कोणती मी तयारी ठेवली असेल, तर ती म्हणजे अनावश्यक गुंतागुंत तयार झाली तर तिला तोंड देण्याची.

नीलः विरोधकांचाही पूर्ण व्देष करू शकत नाहीस तू. तुझ्याकडून खरं तर कुणालाच कसलाच धोका नाही.

बीनः सगळेच विरोधक व्देष्टे नसतात नील, काही तात्पुरते स्वार्थ आणि वर्चस्वाच्या कल्पना यांतूनही काहीजण

विरोध करतात. तुझा जय तसाच आहे. याला नेता हवा होता--पुरुष ! एवढंच ! तो काही माझा व्देष्टा नाही.

नीलः नाहीच. आणि तुझ्या विजयानं तो व्यथितही झालेला नाही. नेतृत्वाबद्दलच्या आणि राज्यपध्दतीबद्दलच्या कोणत्याच हेकट कल्पना तो मानत नाही. कदाचित त्याला दुसरंच काही अधिक महत्त्वाचं वाटत असेल.

बीनः तू भाग्यवान आहेत नील. तुला दुर्मिळ असा प्रियकर मिळालेला आहे. खरंच चांगला माणूस आहे तो. मला त्याला एकदा भेटायची इच्छा आहे. तो जर नुसता बोलला जरा वेळ माझ्याशी, तर स्त्री-पुरुष या भेदावरच फक्त अवलंबून राहणं थांबवेल तो. माझा दृष्टिकोण त्यानं समजून घ्यावा अशी माझी फार इच्छा आहे.

नीलः मी घेऊन येईन एकदा त्याला.

बीनः तुझ्यासमोर माझे विचार ऐकून घेणं कदाचित् आवडणार नाही त्याला. पुरुषी वर्चस्वाच्या कल्पनांनी नाही म्हटलं तरी थोडं ग्रासलेलं आहेच त्याला. त्याला एकट्यालाच पाठवून दे एकदा.

नीलः हरकत नाही. तुला इतकी आपुलकी वाटते आमच्याबद्दल याचा फार आनंद वाटला मला. येऊ ?

बीनः हं.

नीलः पुन्हा एकदा तुला सुयश चिंतिते !

बीनः ( हसून ) हं. ( नील जाते.) अग वेडे, उद्देश चांगलेच आहेत माझे. प्रश्न सोडवायसाठीच धडपडणार आहे मी. पण आपलं राज्य प्रत्येक माणसाच्या विचारांना किंमत देणारं आहे, त्यामुळं जास्तीत जास्त लोक माझ्याबरोबर ठेवायलाच हवेत मला. हितकारक गोष्टी अंमलात आणायलाही हे अधिकारपद हवं ! आणि अधिकारपद टिकवायचं असेल तर, संबंध निरनिराळे घ्यावेच लागणार बदलून,वळवून, अधिक सुरक्षित करून. मला सुयश चिंतलंस तू ! पण हे जिवलगे, या सगळ्या खेळात तू कुठं राहणार आहेस ? तुझ्या इच्छांचं काय होणार आहे ?

( शेट येतो ).

ओहो ! ये ! ये ! तू खरा माझ्या विजयाचा शिल्पकार ! दोन पुरुष आणि दोन स्त्रिया अशी समसमान विभागणी होती--तुझ्या निर्णायक मतामुळंच आज मी या अधिकारपदावर आहे ! तुझं ऋण मी कधीच विसरणार नाही. तुला काय हवं आहे ते चांगलं समजलेलं आहे मला. मला पूर्ण विश्वास आहे की, ते मी तुला मिळवून देईनच.

शेटः आता तर तुला 'माझी' म्हणायची इच्छा नाही. तुला माझी म्हणताना हातात रग, आवाजात हक्क आणि प्रत्यक्ष तुला माझ्या आधीन करून घेण्याची शक्ती हवी आहे मला. आपले संबंध अधिक जवळचे--निकटचे व्हायला हवेत.

बीनः मी तुझीच आहे शेट. तुझ्यासाठीच आहे. फक्त थोडा धीर धरावा लागेल तुला. मग सगळं तुझंच आहे.

शेटः तुझ्या या बोलण्यातून काहीच जागं होत नाहीय माझ्यात. मी पुरुष असतो तर-- ही नुसती एक कल्पनाच आहे. आता याच कल्पनेचं मला आकर्षण का वाटतं ? सत्ता संपादन करण्याइतकी आकांक्षाशक्ती नाहीय माझ्यात. पण नशीबाचे फासे अनुकूल पडले तर सत्ताधारी व्यक्तीशी संबंध राहू शकेल माझा. सत्ताधारी व्यक्ती पुरुष असेल तर, स्त्री व्हावं लागणार मला. पण पुरुष होऊन स्त्रीवर वर्चस्व गाजवायची इच्छा आहे माझी. याहूनही--बुध्दिमान,कर्तबगार स्त्रीवर हक्क गाजवता येण्यासारखं नशीब नाही ! म्हणूनच मी नाथच्या विरोधात तुला पाठिंबा दिला.सध्या तरी या नपुंसकाच्या जोरावरच तू इथं आहेस !.

बीनः स्वतःला नपुंसक म्हणू नकोस ना शेट ! ही फक्त तात्पुरती अवस्था आहे तुझी ! निर्मितीदेवता आपल्यावर कृपा करायला नेहमीच तयार आहे. फक्त ती कृपा मिळवण्यासारखी परिस्थिती निर्माण करण्याचा अवकाश आहे. आणि सावधपणे यशस्वी चाल करण्यात मी कमी पडणार नाही. आपल्या मीलनाला मीही काही कमी उत्सुक नाही. ( शेट तिच्या खांद्यावर हात ठेवतो, तो बाजूला करून -- ) तुझा असा स्पर्श नको आहे मला शेट -- एक दिवस असा येईल की, तुझ्या याच हाताचा स्पर्श मला गगनचुंबी ज्वालांचं अस्तित्व देईल आणि त्या ज्वालांच्या नृत्यात आपण हरवून जाऊ...

शेटः ठीक आहे. वाट पाहावी लागणारच. त्याची कल्पना आहे मला.

बीनः तू संपूर्णपणे माझ्यावर विश्वासून राहा. दुसऱ्या कुणाच्या बोलण्यानं मनात किल्मिष येऊ दिलंस तर शक्तीच नाहीशी होईल माझी.

शेटः तसं होणार नाही. मला जे हवं आहे ते फक्त तूच देऊ शकशील. दुसऱ्या शक्यता ऐकायचीही माझी

तयारी नाही. तू मला पुरुषत्व मिळवून द्यायचं कबूल केलंस. नाथ मला स्त्रीत्व मिळवून देणार होता. यातली निवड करून मी तुझ्या बाजूला आलो. आता आणखी शक्यता तरी कुठे काय आहे ?

बीनः तसं नाही शेट, इतका अंध होऊन स्वस्थही राहू नकोस. तुला कळणाऱ्या हालचालींची मला माहिती देत राहा. माझा विरोधक जरी बोलायला आला तुझ्याशी तरी टाळू नकोस त्याला. राज्यातल्या हालचालींची माहिती मिळालीच पाहिजे मला. आज तू केंद्रबिंदू आहेस. हालचालींचा रोख तुझ्या अवतीभवतीच राहणार आहे हे निश्चित ! तुझी खूप मदत होऊ शकेल मला.

शेटः तुला अपेक्षित त्या गोष्टी माझ्याकडून होतील. तुझ्या अपेक्षेप्रमाणेच होतील. बरंय, येतो.

बीनः हं. ( शेट जातो.) तसा बहुतेक आता काही धोका नाही. फक्त एकेक पाऊल टाकत गेलं पाहिजे इतकंच. ( जाते. आता पुन्हा उजव्या बाजूच्या खुर्चीवर प्रकाश. नाथ आणि जय बोलत बसले आहेत.)

जयः नीलकडून निरोप आला आहे मला बीनचा. भेटायला बोलावलंय.

नाथः अवश्य जा !

जयः जाणार आहेच मी ...मी काही तुझा कर्मठ अनुनायी नाही. पुरुषपक्षाच्या बाजूचा आहे इतकंच.

नाथः याहून जास्त काही अपेक्षाही नाही तुझ्याकडून. सध्या इतकंच खूप आहे. काही काही गोष्टी बोलायच्या वेळा असतात. मी योग्य वेळीच फक्त तुला सावध करणार आहे. याहून अधिक आत्ता काही नाही.

जयः म्हणजे काय म्हणायचंय तुला ? मी तुझा पाठीराखा म्हणून मला नष्ट करायचा प्रयत्न करेल ती ?

नाथः असंही मी काही म्हटलेलं नाही. नष्ट करणं तसं सोपंही नाही. तुला नष्ट करण्यानं नीलचा पाठिंबा गमावून बसेल ती.

जयः म्हणजे सध्याच्या परिस्थितीत बदलाची शक्यताच नाही. सत्तेपासून दूरच राहणार आपला पक्ष.

नाथः असा निराशही होऊ नकोस. यात दुसऱ्याही काही गोष्टी आहेत. आशावादी राहा--इतकंच सांगतो.

जयः ठीक आहे. बीनकडे जाऊन आल्यावर पुन्हा भेटेन मी तुला. या तुमच्या संघर्षात फार गुंतायची माझी इच्छा नाही इवढं मात्र लक्षात ठेव.

नाथः ठीक आहे. मी मान राखेनच तुझ्या इच्छेचा, पण परिस्थिती काय वळण घेते तेही पाहावं लागेल. कुणी सांगावं-- कदाचित तुझेही विचार बदलतील...

जयः माझ्या बाबतीत तरी अती आशावादी राहू नकोस. मी बदलण्याची शक्यता नाही.

नाथः ठीक आहे. तसं झालं तरी उत्तमच ! पराभव तर काय झालेला आहेच आपला-- आता फक्त ही दुसरी लढाई आहे... परंतु एकूण चित्राचा अंदाज आल्यानंतरची ही लढाई आहे. ही तिला जड जाईल एवढंच सांगतो...

जयः मी नेहमीच तुला सुयश चिंतलेलं आहे. बरंय, जातो.( जातो.)

नाथः अजून बच्चा आहेत तू. माझे अंदाज खरे ठरले, तर या संघर्षात सगळ्यात जास्त तूच गुंतणार आहेस ...पण हरकत नाही. परिस्थितीच तुझ्याकडून तुझी भूमिका वठवून घेईल...(शेट येतो.) ये,ये ! निरोप पोचला म्हणजे ! वा,वा,वा ! आनंद वाटला ! ये ! बस ! ( शेट बसतो.) तसं विशेष काही नाही. सहज बोलावलं होतं. म्हटलं गप्पा मारू जरा !कसं काय अधिकारग्रहण समारंभ पार पडला ! अभिनंदन.. अभिनंदन ! ... अरे आपण मित्रच आता ! वैर संपलं आता ! तुमच्या वाईट गोष्टींना आम्ही विरोध जरूर करणार -- अगदी कडाडून ! पण -- चांगल्या गोष्टींना पाठिंबाही देणार ! शेवटी काय -- या तेज राज्याच्या भल्यासाठीच तर झटतो आहोत आपण सगळेच !

शेटः तुझा हा दृष्टिकोण चांगला आहे. पराभवानं तू विचलित झालेला नाहीस.

नाथः छे छे ! सर्वांच्या इच्छांनीच तर चालणार हे ! विचलित होऊन कसं चालेल ! परंतू तुझा प्रश्न सोडवण्याचा माझा मार्ग तुला पटला नाही याचं वाईट वाटलं.

शेटः माझाही तुला दुखवण्याचा हेतू नव्हताच. माझ्या अपेक्षा जरा वेगळ्या होत्या इतकंच.

नाथः हरकत नाही. बीनच्या पध्दतीनं होऊ दे. कुणीकडून तरी तुझा प्रश्न सुटावा एवढीच इच्छा आहे. लौकर सुटावा.

शेटः बीनवर विश्वास आहे माझा.

नाथः आणि ती दगाही देणार नाही याला. ती त्या प्रयत्नातही असेलच. यशस्वीही होईल ती. मला आनंदच आहे. मला काही सत्तेची हाव नाही.

शेटः सत्तेची हाव तर बीनलाही नाही. पण सत्तेशिवाय चांगल्या गोष्टी अंमलातही आणता येत नाहीत. म्हणून

सत्ता आवश्यक आहे इतकंच.

नाथः ठीक आहे,भेटलास, आनंद वाटला. बीनला नमस्कार सांग माझा.

शेटः ( उठत ) ठीक आहे. असं मैत्रीचं वातावरण राहिलं, तर आपल्या राज्याचा स्वर्ग होणं लांब नाही.

नाथः अरे, असंच राहणार वातावरण. ते कशाला बदलतंय ? स्वर्ग होणारच आपल्या राज्याचा.

शेटः बरंय. येतो.

नाथः हं. बरंय. ( शेट जातो. नाथ काही क्षण उभा राहतो आणि जातो.आता पुलावर जय आणि नील.)

जयः कशाला बोलावलंय बीननं मला ? नाथला म्हणालो मी, की मी जाणार आहेच. पण कशासाठी जायचं ? स्पर्धा संपली, निकाल लागला, सगळं झालं, आता या लोकांचा फार संपर्क नको आहे मला.

नीलः असं कसं म्हणतोस ? तुझ्याबद्दल चांगलं बोलत होती ती. सम्राज्ञी आहे ती. तिनं स्वतःहून भेटायला बोलावणं हा सन्मान आहे तुझा. असा निष्कारण तुटकपणा चांगला नाही. मुख्य म्हणजे हिरव्या चक्राचा धारक आहेस तू !

जयः सन्मान कसला आलाय त्यात ? उगीचच कुणी सांगितलेत हे उद्योग !

नीलः मला हे तुझं योग्य वाटत नाही. नसलेली कटुता कशाला निर्माण करायची ? जाऊन आल्यानं काय बिघडतंय ! ये जाऊन !

जयः बरं, ठीक आहे, भेटू नंतर.

नीलः हं. ( नील उजवीकडे जाते, जय डावीकडे. नंतर जय डावीकडून प्रवेश करतो. बीन त्याचं स्वागत करते.)

बीनः ओह ! ये ! ये ना ! बस । ( तो बसतो. ती जवळच्या खुर्चीवर बसते.) खूप आनंद वाटला ! आपले पक्ष विरोधी, पण निर्मितीला दोन्हीही पक्ष लागणारच ! ( हसते.)

जयः तुला बोलावंसं वाटलं माझ्याशी. आनंद वाटला. विरोधकाचे काटे सतत वागवत राहायची इच्छा नाहीच माझी.

बीनः माहीत आहे ते मला. तू एक चांगला आणि विधायक माणूस आहेस. तुझ्यासारखी माणसं ही आपल्या राज्याची अभिमानास्पद संपत्ती आहेत !

जयः इतकं चांगलं बोलल्याबद्दल मी आभारी आहे तुझा. परंतु तितकी योग्यता नाही माझी.

बीनः ते जाऊ दे. मी तुला बोलावलं आहे ते एका महत्त्वाच्या कारणासाठी. वैर जर नष्ट करायची तयारीच आहे तुझी, तर तू सहभागी का होत नाहीस आमच्या कार्यात ? तुझी मतं तू बदल असा माझा आग्रह नाही. पण तू माझा प्रमुख सल्लागार व्हावंस अशी माझी इच्छा आहे. तुझ्या बुध्दीचा राज्याला उपयोग होऊ द्यायला हवास तू.

जयः ही तुझी इच्छा मला अगदीच अनपेक्षित आहे. मला विचार करावा लागेल.

बीनः तिचार करण्यासारखं काय आहे त्यात ? तुला सल्ल्याचं पूर्ण स्वातंत्र्य राहील-- तो मानणं न मानणं याचं मला स्वातंत्र्य राहील.

जयः ते ठीक आहे. परंतु माझ्या खाजगी गोष्टींवर याचे काय परिणाम होतील याचा अंदाज घ्यावा लागेल मला. एकदम होकार देण्याइतकं सोपं नाही हे. मी वेगळाच दिसायला लागेन लोकांना. मी आमिषाला बळी पडलो असंही म्हणतील लोक.

बीनः शक्य आहे, होतीलही सुरुवातीला गैरसमज. परंतु गैरसमज दीर्घकाळ टिकत नाहीत; शिवाय नव्या गोष्टी सवयीनं जुन्याही होतात. जेवायला थांबणार ? म्हणजे अधिक सविस्तर बोलता येईल मला.

जयः नाही. मी पुन्हा येईन.

बीनः ठीक आहे -- जशी तुझी इच्छा ! पण...मी...मी वाट पाहते आहे तुझी हे लक्षात ठेव...आणि...शक्यतो लौकर ये पुन्हा...

जयः हं; अच्छा ! येतो ! ( जातो. नंतर बीन जाते. आता पुलावर नाथ आणि जय.)

नाथः हे सर्वस्वी तुझ्या इच्छेवर आहे. मला यात गैर काहीच दिसत नाही.

जयः नील तेच म्हणते आहे. पण तूही तेच म्हणतो आहेस हे विशेष आहे.

नाथः मला वाटतं, सरळ गोष्टींना सरळ प्रतिसाद द्यावा. कशाला संशय घेत बसायचं प्रत्येक गोष्टीचा ? तुला तुझ्या मतांचं स्वातंत्र्य ती ठेवतेच आहे. आणि सहवासानं तुला तिचं अधिक बरोबर वाटणार असेल, तर ती शक्यता टाळायची माझी इच्छा नाही. मलाही तुझं स्वातंत्र्य महत्वाचंच वाटतं.

जयः निष्कारण ओढला जातोय मी यात. खरं तर मला यात रस नाही.

नाथः रस असण्यानसण्याचा प्रश्न नाही.(नील येते.) ही नील आली. ये नील.

नीलः तू धोके पटवून दिले असणार जयला.

नाथः नील, मला खरं तर तू ओळखतही नाहीस. तरीही भित्रा घरूनच चालतेस तू मला. जय स्वतंत्र आहे असं मी मानतो. तो आमिषाला बळी पडला असंही मी म्हणणार नाही. तिच्या हालचाली जयमार्फत मला सदोदित समजण्याचा धोका पत्करायला ती तयार आहे. जयला तिच्या बाजूला गमावण्याचा धोका मीही पत्करायला तयार आहे. तिच्याइतकाच मलाही आत्मविश्वास आहे.

नीलः माफ कर, मी गैरसमजानं बोलले. तुझ्यातल्या या चांगुलपणाची ओळख नव्हती मला. जयला बीननं सल्लागार म्हणून बोलावणं हा मला त्याचा बहुमान वाटतो.

नाथः माझं काही म्हणणं असूच शकत नाही यात. फक्त तुझं तू बघून घे. कारण नील,बीन ही एक, तुझ्याहून प्रौढ असेल, पण आकर्षक स्त्री आहे.( हसतो.) हे बोलण्यात माझा काहीही उद्देश नाही हं. सहज गंमतीनं बोललो मी. बरंय.( जातो ).

नीलः जाता जाता किल्मिष पेरायचा प्रयत्न केलान तुझ्या नेत्यानं. पण मला माहिती आहे, की बीन ही एक चांगली स्त्री आहे. माझा प्रियकर ती हिरावून घेणार नाही.

जयः पण तुझा प्रियकरच हिरावला जाणं शक्य नाही असं का म्हणत नाहीस ?
( हसतो.जातात. आता शेट आणि बीन. )

शेटः हे बघ बीन, थोडा कमीजास्त काळ लागणारच, कळतंय ते मला. आणि तुझे मार्ग तूच ठरवायचे आहेत. योग्य त्या सावधगिरीनंच जावं लागणार तुला हेही मान्य आहे मला.

बीनः फक्त एकच भीती वाटते तुझी. हा मासा गळाला घेता घेता मत्सरानं तू लांब जाशील की काय ? कारण माझ्याकडून जे तुला हवं आहे ते सगळं आधी,मला,त्याला देत राहावं लागणार आहे ! सगळा खटाटोप करायचा तुझ्यासाठी म्हणजे अर्थातच आपल्यासाठी. पण तुझा विश्वास शेवटपर्यंत टिकायला हवा.

शेटः त्याची तू काळजी करू नकोस बीन. शेवटी ते पुरुषत्व मिळायचंय मलाच. म्हणजे माझंच आहे ते. त्याच्याशी शरीरसंबंध जरी करावा लागला तुला तरी माझी हरकत नाही.

बीनः ते तर करावंच लागेल. फक्त तू आता अधून मधून नीलचे कान फुंकणं सुरू कर. आमच्या जवळीकीबद्दल बोल तिच्याशी. तुलाही राग आलाय असं दाखव.काही महिने होऊन गेले आहेत. आता जय, नीलपेक्षा जास्त वेळ, माझ्याबरोबर असतो.

शेटः पुढं विचार काय आहे तुझा ?

बीनः ते तू विचारायचं नाहीस. तुझी किंमत तुला मिळेल. एकदा हे सगळं पार पडलं की, आपल्याला पुढे सुखात राहता येईल. मी एकदा जिंकू शकते याचा अर्थ मी पुढे अनेकदा जिंकू शकेन.

शेटः ठीक आहे. मी वाट पाहतोच आहे. तू मात्र...( जय येतो. त्याला पाहून विषय बदलत-- )-- तर तुला जर वेळ असेल थोडा तर बोलायचं होतं जरा.

बीनः मला आत्ता वेळ नाही. काही महत्त्वाची कामं आहेत. नंतर बोलू आपण.

शेटः जय आला तेव्हाच मला वाटलं -- काही तरी महत्त्वाची कामं असणार म्हणून.जातो मी.(जातो.)

जयः कशाला दुखवलंस बीन त्याला ? ऐकून घ्यायचं होतंस की.

बीनः काही नाही. मी तुला जास्त महत्त्व देते याचा मत्सर वाटतो काही जणांना. पण आपण लक्ष द्यायचं नाही. राजकारणात हे चालणारच.

जयः म्हणजे बीन, पण, माझ्यामुळं तुला --

बीनः मला पर्वा नाही. सत्ता आणि कीर्ती यांपेक्षा मला काय बरोबर वाटतं हे महत्त्वाचं आहे. नुसती सत्ता जपत बसण्यात मला रस नाही.

जयः तुझ्या या खंबीर स्वभावाचं फार -- म्हणजे -- आकर्षणच वाटतं मला.

बीनः जाहीरपणे बोललं तर टिंगल होऊ शकते काही गोष्टींची -- पण विव्दत्ता,स्वार्थत्याग, राज्यभक्ती, नम्रता आणि चारित्र्य या गुणांच्या प्रमाणांना त्यांचं त्यांचं मोल असतंच. या गुणांची जोपासना मला नेहमीच वाटत आलेली आहे महत्त्वाची. तू विरोधी असूनही सहकार्य देतो आहेस. लाख मोलाची गोष्ट आहे ही.

जयः बरं ते असू दे. अल्पसंख्याक आणि मागासलेल्या लोकांच्या प्रश्नांबद्दल आज बैठक आहे दुपारी, त्या संदर्भात काही चर्चा करायची होती मला.

बीनः अशीच माणसं मला हवी आहेत. तू आमच्या बाजूला असतास तर किती बरं झालं असतं ! असो ! चल.

( जातात. आता पुलावर नील मध्यभागी आणि दोन बाजूंना खाली काही अंतरावर शेट आणि नाथ. या दृश्यातील संभाषणे निरनिराळ्या वेळी झालेली असल्याचे सूचित करणारी कृत्रिमता ठेवावी. )

शेटः तू आमच्याच पक्षाची आहेस.तुला कल्पना देणं कर्तव्य आहे माझं.बीन आणि जय यांचे संबंध वाढत चालले आहेत.त्यांचं हे वागणं मला अयोग्य वाटतं.तुला दुःख होईल असं त्यांनी वागू नये असं वाटतं मला.

नीलः गेल्या काही महिन्यांत जय दुरावत चालला आहे माझ्यापासून हे खरं आहे.पण हे असं-- मला खरं वाटत नाही. जयचं प्रेम आहे माझ्यावर. वाढत्या जबाबदारीनं मला त्याचा वेळ कमीच मिळणार.

नाथः नील, आता मला एक भीती वाटायला लागलीय. माझा पाठीराखा तर एक कमी होणारच,पण तुझा प्रियकरही तू गमावून बसणार असं वाटतंय मला. मला सहानुभूती वाटतेय तुझ्याबद्दल. मी तर काय पराभूतच आहे. आता तर सत्ता मिळायची शक्यताच नाही मला. परंतु बीननं तुझीही पर्वा करू नये हे वाईट आहे. या प्रकारात रस राहिलेला नाही मला, पण केवळ माणुसकी म्हणून बोलल्याशिवाय राहवत नाही.

नीलः तुझ्या दयेची--सहानुभूतीची गरज नाही मला.

शेटः तासन् तास एकांतात असतात बीन आणि जय. स्त्री आणि पुरुष. मी स्त्रीही नाही आणि पुरुषही नाही म्हणून मत्सरानं बोलतोय असं समजू नकोस. आपल्या-आपल्यात मला हे चांगलं वाटत नाही. अर्थात बीनला हे सांगायची हिंमत नाही मला. तूच जयला आवर घाल.

नीलः नाही, नाही,नाही. जय असं करणार नाही.

शेटः प्रत्यक्षात तिथं काय घडतं हे तुला कळूं शकत नसलं तरी, तुमच्या संबंधांच्या बदलत्या स्वरूपांचा अनुभवच तुला सत्य शिकवील.

नाथः बीनच्या घातकपणाची कल्पना होती मला. पण या अनाचाराची मी -- म्हणजे -- इतकी अपेक्षा केली नव्हती.

शेटः जय बीनच्या कह्यात गेला आहे.

नाथः जय स्वतःला विसरत चालला आहे.

शेटः जयला मस्ती चढत चालली आहे.

नाथः जयला माणसांची किंमत उरलेली नाही.

नीलः ( जोरात ) नाही नाही नाही नाही... का तुम्ही असं बदनाम करताहात त्याला ? का ?

( नाथ आणि शेट जातात. काही क्षण रिकामे. जय येतो. )

जयः आज गंभीर दिसतेयस तू नील.

नीलः नुसती वाट पाहण्यात आयुष्य घालवायचं म्हणजे काय होणार माणसाचं ?

जयः खरं तर ही जबाबदारी घेणारच नव्हतो मी नील. केवळ तुझ्या आग्रहाखातर आणि समाधानाखातर स्वीकारत गेलो मी या गोष्टी. आता असं का बोलतेस ?

नीलः चूक झाली माझी. फक्त चांगल्या शक्यतांचाच विचार केला मी. वाईट शक्यता मनातही आल्या नाहीत माझ्या.

जयः आपला एकत्र असण्याचा काळ कमी झाला आहे, याखेरीज वाईट काय घडलंय नील ?

नीलः खूप घडलंय--घडतंय. बीनच्या आहारी जात चाललायस तू. तुझी प्रतिष्ठा वाढण्यात मला समाधान वाटलं-- म्हणूनच तुझ्या सहवासाच्या थोड्या त्यागाला तयार झाले मी. पण तू मला विसरूनच जाण्याचा धोका दिसला नाही मला. तुझं प्रेम मी गृहीतच धरून चालले.

जयः मग आहेच माझं प्रेम नील तुझ्यावर. कुठं काय फरक पडलाय ?

नीलः मला ज्या गोष्टी ऐकायला मिळतायत त्या अगदीच अविश्वसनीय वाटत नाहीत मला.

जयः काय ऐकायला मिळालं तुला ? कोण बोललं ?

नीलः मला खूप काही बोलायचंय तुझ्याशी. पण इथं नको. मला रडू येईल असं वाटतंय.

जयः कुणीतरी निष्कारण कान फुंकलेत तुझे नील, चल... माझ्यात आणि तुझ्यात काडीचा दुरावा निर्माण झालेला नाही हे लक्षात ठेव, चल.( तो तिला घेऊन जातो. आता नाथ येतो. जय त्याच्यासमोर उभा राहतो.)

नाथः बस.

जयः बसायला वेळ नाही मला.

नाथः तू येशील असं वाटलंच होतं मला. पण तरी फार दिवसांनी आठवण झाली तुला माझी.

जयः आठवण बिठवण काही नाही. हे काय चाललंय--काय भरवून दिलंयस तू नीलच्या मनात ?

नाथः हां. म्हणजे रागावून आलायस तू ! जाब विचारायला -- अं ? हरकत नाही.

जयः हे गैरसमज निर्माण करून काय साधणार आहेस तू ?

नाथः हां हां हां -- गैरसमज म्हणू नकोस. आणि मी जे करतोय - वागतोय, बोलतोय ते तुझ्या हिताचं असण्याची एक शक्यता लक्षात घे तू.

जयः माझं कसलं हित ?

नाथः मी बोललो नाही इतके दिवस. पण आता तुला जागं केलंच पाहिजे. बीन गेले काही महिने वर्षाव करतेय तुझ्यावर अधिकारांचा, प्रलोभनांचा,प्रतिष्ठेचा आणि आता तर-- शरीरही देतेय ती स्वतःचं--तुला--हं हं हं-- चिडू नकोस-- पुढं ऐक. हे सगळं एक पुरुष म्हणून तू तिला आवडतोस एवढ्यासाठीच चाललंय असं तुला वाटतं ? की तू बुध्दिमान आहेस म्हणून तिला तुझा आदर करायचाय असं तुला वाटतं ?

जयः मला ती आपल्या ताब्यात घेतेय अशी भीती वाटतेय तुला ?

नाथः मला भीती वाटायचा प्रश्नच नाही. राजकारणातलं यश कधीच दुरावलं आहे.पण याच्या कारणांचा कधी विचार केलायस तू ?

जयः पुढं बोल.

नाथः आता तुला सावध करणं हे माझं कर्तव्य मानतो मी. निवडणुकीच्या वेळी, शेट नपुंसक असून,तिच्या बाजूला कसा गेला हे माहीत आहे तुला ? त्याला सत्ताधारी व्यक्तीशी संबंध हवा होता. आणि तो संबंध पुरुष म्हणून हवा होता. त्याला पुरुषत्व मिळवून द्यायचं आश्वासन दिलंय बीननं.

जयः हं -- मग ?

नाथः ते आश्वासन पूर्ण करून -- आणि पूर्ण करता करता आपलं स्थान पक्कं करावचंय तिला. तुझं पुरुषत्व ती तुझ्याकडून मागणार आहे शेटसाठी. निर्मितीदेवतेपुढं तू स्वेच्छेनं तुझं पुरुषत्व दान केलंस शेटला, की तिचा डाव पूर्ण होणार आहे. परिणामतः तू नपुंसक होणार आहेस. म्हणजेच नीलपासून तू कायमचा दुरावणार आहेस. हे सगळं दिसत असून आणि तुम्हा दोघांबद्दल असलेली आस्था आणि प्रेम गिळून मी गप्प राहावं असं वाटतं तुला ?

जयः तू कल्पनाशक्तीला फार ताण देतोयस असं वाटतं मला. ते काही खरं नाही.

नाथः खरं नसलं तर उत्तम आहे. पण हे खरं आहे असं समज तुझ्या लक्षात आलं आता, तरी तुला माघार घेणं आता कठीण आहे.

जयः पराभवानं डोकं फिरलंय तुझं. आणि माझा मत्सर वाटतोय तुला. दोन स्त्रिया माझ्यावर जीव टाकतायत याचा.( नाथ हसतो.)हसू नकोस. तुझी आता खरी ओळख पटायला लागलीय मला. बीन का इतकी तुझ्याविरुध्द बोलते हे लक्षात यायला लागलंय माझ्या. तू एक कमकुवत, संशयी, धोकेबाज आणि तिरस्करणीय माणूस आहेस. माणसांची आयुष्यं विस्कटण्याखेरीज काहीच होणार नाही तुझ्या हातून.पण माझं आयुष्य विस्कटू देणार नाही मी तुला. मी पुरून उरेन तुला. लक्षात ठेव.( रागाने निघून जातो ).

नाथः रागावला ! गेला ! इतकं सगळं अंदाजाबरहुकूम ! आता हा पुन्हा माझ्याकडे येईल तो अत्यंत नम्र होऊन--आणि मऊ होऊन !( इथे हे द्श्य संपते. आता बीन व शेट येतात.)

शेटः अजूनही मधूनमधून तो नाथकडे जातो. काल गेला होता-- प्रस्तावनेतच तू असे दिवस घालवू लागलीस तर धोका वाटतो मला.

बीनः हं, तू काळजी करू नकोस. आता जवळ आलं आहे सगळं.

शेटः बरं जातो मी. एवढीच माहिती द्यायची होती तुला.

बीनः हं, ठीक आहे.( शेट जातो ). हे निर्मितीदेवते, आतापर्यंत सगळं मनासारखं घडत आलं आहे. पूर्ण यश देणं तुझ्याच हातात आहे.( काही क्षण - नंतर जय येतो.)

जयः बीन --

बीनः अरे ! जय ! ये ना !

जयः मला काही खाजगी बोलायचंय तुझ्याशी.

बीनः हं, बोल.

जयः आपले संबंध वाढत चालले आहेत बीन आणि आता हे नीलला खटकायला लागलंय. बरोबर आहे तिचं. तुझ्या जवळिकीमुळं मी तिला दुरावेन असं मला वाटत नाही -- पण तुझ्याबद्दलही एक आसक्ती निर्माण होते आहेच माझ्या मनात.

बीनः होऊ दे की ! मी काहीतरी हातचं राखून ठेवलंय का ? माझं सगळं तुझंच आहे की !

जयः ते ठीक आहे बीन ! पण नीललाही दुखवायचं नाहीय मला. बीन, मी एका बिनतोड प्रश्नात सापडलोय. नील प्रेयसी आहे माझी -- पण तुझ्यासारख्या कर्तबगार, आकर्षक, शक्तिमान, बुध्दिमान स्त्रीला उपभोगणं -- यातही माझ्या पुरुषत्वाच्या सन्मानाची मस्ती वाटते मला. तुझाही सहवास सोडायची आता माझी इच्छा नाही. पण यातून काहीतरी मार्ग निघायला हवाय आता.

बीनः नील जळफळायला लागली वाटतं ! खरं तर तू तिच्यापासून दुरावत नाहीयस ना एवढंच तिनं बघावं--मी एक --आणखी एक स्त्री म्हणून आले तुझ्या आयुष्यात -- तर काय बिघडतंय ?

जयः एवढा विचार करू शकणारी नाहीय ती बीन. स्त्रीस्वभावाचा कमकुवतपणा तिला ओलांडता येणार नाही. ( बीन जरा वेळ विचारात...) कसला विचार करतेयस बीन ?

बीनः एक मार्ग सुचतोय मला -- पण --

जयः पणबीण काही नको. बोल.

बीनः पण तो मार्ग तुला आवडणार नाही बहुतेक.

जयः तू सांगितलेल्या गोष्टी मी स्वीकारतोय की नाही बीन ? तुला जे योग्य वाटेल ते अगदीच अयोग्य असेल असं मला वाटत नाही.

बीनः पण त्या मार्गात... वाटणी करावी लागेल. तू कायम तिच्याकडे राहशील -- आणि तुझं पुरुषत्व कायम माझ्याजवळ राहील --( इथं जय दचकतो, पण सावरतो. ) तू स्वेच्छेनं तुझं पुरुषत्व शेटला बहाल कर. निर्मितीदेवतेच्या कृपेनं हे शक्य होईल आपल्याला. शेटच्या शरीरातून-- त्याच्या मार्फत -- आपलं मीलन सतत चालू राहील आणि तू सतत नीलजवळही राहशील -- फक्त काही शक्यता वगळून ... असा का बघतोयस ! अं ?

जयः नाही, काही नाही.

बीनः रागावलास ?

जयः नाही बीन, तुझ्या माझ्यावरच्या प्रेमापुढे हतबल झालो ग मी.( जरा धीर एकवटून) ठीक आहे बीन. हा मार्ग ठीक वाटतोय मला. तू इतकं करत आलीस माझ्यासाठी आजपर्यंत-- मला इतकंही जमू नये ? मला मान्य आहे बीन. तू काळजी करू नकोस. नुसतीच तेढ वाढत राहण्यापेक्षा हा मार्ग चांगला आहे.

बीनः यातून आणखी अनेक गोष्टी होणार आहेत जय, माझ्या चांगल्यासाठी ! तुझ्या प्रेमात मी खोल गुंतलेय जय ! तुझ्या पुरुषत्वाचा दुरावा सहन होणार नाही मला.

जयः प्रेमात खोटेपणा असता तर तो कळला असता बीन. आणि समजा झाला थोडा खोटेपणा सुरुवातीला तरी आता सगळं जे आहे ते खरं आहे हे निश्चितपणे जाणवतंय मला. तुझा मार्ग मान्य आहे मला.

बीनः मग उशीर नको. लौकरच !

जयः ठीक आहे. ( बीन त्याच्या जवळ येते - आलिंगन देते. चुंबनासाठी त्यांचे ओठ जवळ येत असताना अंधार.  आता समोर पुलावर एकटा जय. विचारात. सिगरेट काढतो. शिलगावतो. मधूनमधून झुरके घेत उभा. काही क्षण असे गेल्यावर नील येते. पण ती जवळ येऊन उभी राहिली तरी जयचे लक्ष नाही.)

नीलः जय --

जयः ( जरा दचकून ) अं ?... तू होय !

नीलः एवढा कसला विचार करतोयस जय --

जयः नाही.. कुठं काय...

नीलः काहीतरी लपवतोयस तू जय. मला तुझा खूप अनुभव आहे. तेवढ्या अनुभवातून एवढं समजतंय मला. तू कुढत राहू नकोस. माझ्या तुझ्याकडून असलेल्या अपेक्षांनी तुझा छळ करायचा नाही असं ठरवलंय मी. आपले संबंधही कायम राहावेत एवढी एकच इच्छा आहे माझी.

जयः हा तुझा मनाचा मोठेपणा आहे नील. पण... तू काळजी करू नकोस.( काही क्षण) ...उगीचच गुंता होत चाललाय सगळा. उगीचच... ज्या गोष्टींत फारसा रस घ्यायचा नव्हता मला त्यांचा एक अविभाज्य भाग होतोय मी ...

नीलः प्रश्न समोर उभे ठाकल्यावर मार्ग काढल्याशिवाय गत्यंतरच नाही जय. पण आपल्या प्रेमाला धक्का लागू नये एवढी एकच इच्छा आहे माझी. तुला मिळणाऱ्या प्रतिष्ठेच्या बदल्यात आणखी एक स्त्री तुझ्या आयुष्यात आली असं समजून त्याचे ताण आपल्या प्रेमाच्या संबंधावर येऊ द्यायचे नाहीत असं ठरवलंय मी. तुला योग्य वाटेल ते तू कर. माझी कशालाच हरकत नाही. बीनबद्दल मात्र एक अढी निर्माण झालीय माझ्या मनात; तीही काढायचा मी प्रयत्न करीन.

जयः ( काही क्षणांनी...)... आता यात विचारविनिमयाला-- झाली तर --. फक्त नाथचीच मदत होऊ शकेल. त्याला एकदा भेटलं पाहिजे, त्याचे स्वार्थ या प्रश्नात फारसे गुंतलेले नाहीत असं वाटतंय. बघू. ( नीलचे हात हातात घेतो. काहीक्षण. ) उद्या पुन्हा भेटू आपण. निर्णय जास्तीत जास्त लौकर व्हायला हवाय. पण तू निश्चिंत राहा. ( काही क्षण. मग जातात. आता जय पुलावरून येतो आहे. पूल उतरून येऊन तो नाथकडे जाणार आहे. उजव्या बाजूला नाथ वर्तमानपत्र वाचत बसलेला. जयला वाटेत शेट भेटतो.)

शेटः नमस्कार.

जयः हं.

शेटः काय- घाईत ?

जयः होय--जरा--

शेटः आनंद वाटतो मला. तुझ्या कामाची प्रशंसा होतेय सर्वत्र. बीननंही जाहीर उल्लेख केलाय तुझा.

जयः हं --

शेटः चालू द्या ! शुभेच्छा !

जयः आभारी आहे. चलतो मी. जरा -- म्हणजे...

शेटः ठीक, ठीक. भेटू पुन्हा --( शेट हसून जातो. जय पुढे नाथकडे येतो.)

नाथः ( जयला पाहून वर्तमानपत्र बाजूला ठेवत ) अरे वावावा ! ये ! काय राग गेला की नाही ?

जयः अंदाज खरे ठरलेत तुझे.

नाथः मला सत्य दिसत असतं. तुम्ही त्याला अंदाज म्हणता हे दुर्दैव ! बरं मग काय ठरवलंस ?

जयः तुझं काय मत आहे ते जाणून घ्यायचंय आता मला.

नाथः मी काय सांगणार ? तुला वाटतं, मी व्देषानं -- मत्सरानं बोलतोय. प्रश्न तुझा ! मी काय बोलणार !

जयः माझ्या मागच्या वागण्याबद्दल माफ कर. तुझ्या विचारांची किंमत कळलीय मला.

नाथः तू आहेस भावनाशील प्रियकर. मी आहे कोरडा ठणठणीत व्यवहारवादी. माझ्या विचारांचा उपयोग नाही होणार तुला.

जयः उपयोग आहे की नाही, ते कृपया मला ठरवू दे. आता जास्त ताणू नकोस.

नाथः ठीक आहे. बोल. मला योग्य वाटेल ते मी बोलेन. मानणं न मानणं सर्वस्वी तुझ्यावर. प्रथम, या सगळ्याचा तुझ्यावर काय परिणाम झालाय ते सांग मला; म्हणजे मलाही परिस्थिती नीट कळेल.

( जय बोलू लागतो...नाथ ऐकत असलेला.. प्रकाश मंद मंद होत जातो...आता रंगभूमीच्या मध्यभागी समोर फक्त एक प्रकाशवर्तुळ. त्या वर्तुळात जय आणि नील उभे. चेहरे अत्यंत गंभीर. खालील सर्व संवाद त्या वर्तुळाच्या मर्यादेत. प्रथम काही क्षण रिकामे.)

नीलः नाथ काय म्हणाला ?

जयः ते महत्त्वाचं नाही आता नील. आता सगळं काही माझ्या लक्षात आलं आहे. एक क्रूर खेळ खेळला गेलाय आपल्याशी... बीनचा डाव यशस्वी होऊ द्यायचा नाही हे पक्कं ठरवलंय मी. मग त्यासाठी आत्महत्या करावी लागली तरी चालेल.

नीलः नाही नाही -- असं नको बोलूस. दुसरा काही मार्ग निघेल.

नीलः ...मार्ग आहे ...पण...

जयः पण काय ?

जयः ...तुला तो सांगावा की नाही, या विचारात पडलोय मी ...

नीलः सांग. विचार कसला करतोयस?

जयः माझ्यावर तुझं प्रेम आहे की नाही ?

नीलः आहेच. असं का विचारतोयस ?

जयः बीनचा तुला मत्सरही वाटायला लागला होता. आणि आता तर मलाही बीनचा संशय आलेला आहे.

नीलः आपण खूपच सरळ धरून चाललो तिला.

जयः माझी फार क्रूर फसवणूक केलीय तिनं. मी माझं पुरुषत्व स्वेच्छेनं प्रार्थना करून, शेटला बहाल करून तिची आश्वासनपूर्ती करावी एवढ्याचसाठी होतं हे सगळं.माझी बुध्दी,निष्ठा यांची कौतुकं हे नुसतं ढोंग होतं सगळं.

नीलः तिचा डाव हाणून पाडायला वाटेल ते करायची तयारी आहे माझी. कसलाही विचार न करता-- आडपडदा न ठेवता मोकळेपणानं सांग.

जयः आपल्या स्वच्छ, साध्या प्रेमाचा फार घोर अपमान झालाय. यात तिला यशस्वी होऊ देणार नाही मी. तिची सत्ता पक्की करायला फक्त एक बळी म्हणून मी हवा आहे तिला. पण हे होणार नाही.

नीलः आपण लौकर काय ते ठरवायला हवं जय ! प्रत्यक्ष तू जर नकार दिलास या गोष्टीला, तर कसाही छळ करू शकेल ती आपला. आणि सत्तेसाठी इतकी हपापलेली स्त्री काय करू शकेल याची कल्पनाही करता येणार नाही आपल्याला. तुला लक्ष्य ठरवताना सगळा विचार केलेला असणार तिनं.

जयः खरं आहे तुझं. आता उपाय एकच आहे. तोही तुला पटला तर; नाही तर उपाय नाही. आपण दोघांनीही जिवंत राहून यातून निघण्यासारखा एकच मार्ग आहे.

नीलः सांग जय !

जयः तू स्वेच्छेनं - ताबडतोब -- तुझं स्त्रीत्व बहाल करून टाकायचंस शेटला !

नीलः ( अवाक् ) --

जयः मग माझं पुरुषत्व त्याला मिळायचा प्रश्नच राहात नाही.

नीलः ( खचत जाते ) आपला नाश होतोय जय -- काय अपराध होता आपला -- काय अपराध होता...?

जयः तुझा मनस्ताप जाणतो मी नील --पण--दुसरा-- मार्ग-- नाही--

नीलः म्हणजे -- म्हणजे --- मी स्त्री राहणार नाही --मी स्त्री राहणार नाही --

जय विचार कर नील. दुसरा मार्ग नाही.

नीलः ( त्यातूनही सावरत ) पण जय -- हा मार्ग अर्धवट होईल. शेट पुन्हा स्वेच्छेनं--

जयः तुझं स्त्रीत्व तुला परत देईल ! अं ! पण स्त्री किंवा पुरुष असलेल्या व्यक्ती लिंग बदलाला सहसा तयार होत नाहीत. स्त्रीला स्त्रीत्व सुखाचं वाटतं.पुरुषाला पुरुषत्व ! नंतर पुरुषत्वाचा हा प्रश्न हाताळणं तसं गरजेचं राहणार नाही. शेटच हा प्रश्न सोडून देईल.

नीलः म्हणजे तू -- तू --

जयः तू नपुंसक झालीस तरी हरकत नाही नील ! आपण एकत्र राहून बीनचा डाव उद्ध्वस्त करून तिला पराभूत करणं हेच महत्त्वाचं आहे. नाथ तिच्या विरुध्द आहेच. आपणही तिच्या विरुध्द जात आहोत. आणि शेटही, आश्वासनपूर्ती न झाल्याच्या कारणानं किंवा नव्यानं मिळालेल्या स्त्रीत्वाचा आनंद लुटण्यासाठी आणि त्या प्रकारे सत्ताधाऱ्याच्या जवळच्या संबंधासाठी नाथच्या बाजूला जाईल. आणि तसं नाही झालं तरी त्या दोघीच त्या बाजूला उरतील आणि आपलीच बाजू वरचढ होईल. आणि हे सगळं आपल्या विरोधाची तिला शंकाही येण्यापूर्वी व्हायला हवं. नाहीतर ती खूनही घडवून आणील एखाद्या व्यक्तीचा. म्हणजे नाथचा. सध्या तिला नाथला माराचयी आवश्यकता नाही. कारण तो आपल्या मरणानं मरेल अशी खात्री आहे तिची. आणि त्याला प्रत्यक्ष न मारता असं संपवण्यात तिची नीतीमानता अबाधित राहून सत्तेवर राहू शकतेय ती.

नीलः खरं आहे जय. दुसरा मार्ग नाही. मान्य आहे मला.

जयः खरं ! मनापासून सांग नील --

नीलः खरंच ! मान्य आहे मला -- दुसरा मार्गच नाही --

जयः तसं पाहिलं तर नाथला अडचणीच्या,कचाट्याच्या परिस्थितीत आणून त्याला त्याचं पुरुषत्व शेटला बहाल करायला लावू शकली असती ती. पण तिला लक्ष्य खात्रीचं आणि सोपं हवं असेल. किंवा तिच्या शत्रूच्या पुरुषत्वाशी तिला शरीरसंबंध नको असेल. म्हणून ही आपलीच नियती आहे -- हिरव्या चक्रांचा प्रसाद आहे हा --

नीलः हं -- आपली नियतीच आहे ही --

जयः दुसरा एक मार्ग सुचला होता मला, नाथशी बोलताना. आपण शेटचा खून करायचा. पण नील, नाथनं लक्षात आणून दिलं माझ्या-- शेटच्या संरक्षणाची किती कडेकोट व्यवस्था आहे ते ! आपल्या डोक्यात

येऊ शकणाऱ्या विचारांची कल्पना असणारच बीनला. शेटला बीन आपला उपकारकर्ता मानते नील ! आणि त्याला अंतर न देणं हे ती आपलं नैतिक कर्तव्य मानते. कारण तिला सत्ता प्राप्त होण्यात शेटचंच मत निर्णायक ठरलेलं आहे. बीन ही एक नीतीमान स्त्री आहे नील ! म्हणूनच ती इतकी क्रूर होऊ शकते.

नीलः आणि त्यातुनही समज आपण करू शकलोच त्याचा खून, तर बीन --

जयः मला वाटत, नील, आपल्याला निश्चित झेपणाराच मार्ग पत्करावा आपण -- आता जास्त विचार नको --

नीलः ठीक आहे जय -- हेच बरोबर होईल --

जयः चल मग -- उशीर नको -- ( निघतो -- वर्तुळाबाहेर जातो-- )

नीलः थांब जय ! ( जय थांबतो-- वळून पाहातो..) इकडे ये -- ( पुन्हा वर्तुळात येतो.) मला एकदा जवळ घे जय ! माझं एक चुंबन घे. शेवटचं --( आवेगानं त्याला आलिंगन देते...अंधार... आता निर्मितीदेवतेच्या मूर्तीवर प्रकाश -- खाली सौम्य प्रकाशात बसून नील प्रार्थना करते आहे. जय उभा. सौम्य संगीत. जरा वेळाने फक्त नीलवर वेगळा प्रकाश पडत जातो, स्थिर होतो. नंतर हळूहळू नील उभी राहते. आता नॉर्मल प्रकाश ...)

जयः ( लांबूनच ) नील --

नीलः नील नाही मी आता ...संपलं ते संगळं.

जयः नील --

नीलः नील संपली ! ( ही आता नपुंसक झालेली आहे.वागण्या-बोलण्यातून फरक जाणवावा. दुःख वगैरे नाही. रुक्षपणा -- ) आणि जय --

जयः ( लांबूनच ) बोल नील --

नील : ( जोरात ) मी --नील--नाही !( नॉर्मल आवाजात ) आता आपण एकत्र राहू शकणार नाही. माझ्यातलं स्त्रीत्व गेल्यावर आता मला तुझं प्रेम वाटत नाहीय. कदाचित् त्या स्त्रीत्वातच आपलं प्रेम होतं. मी अशीच राहीन. मनाला--अचानक--कोरडेपणा आलाय माझ्या--(जय एकटक पाहत उभा.) मी अशीच राहीन.( जय सुरा काढतो. चेहऱ्यावर निग्रह...)

जयः अशीच कशी राहशील नील ...?

नीलः ( घाबरते ) जय !

जय : आता डावपेचांसाठी रिकामी जागा शिल्लकच ठेवायची नाहीय.. तुझा खून करणार आहे मी... आणि बीनला सांगणार आहे --की--मी माझं पुरुषत्व शेटला बहाल करणार आहे हे तुला कळल्यानं सूडभावनेनं माझ्याआधी तू ही कृती केलीस आणि या तुझ्या कृतीनं संतापून मी तुझा खून केला... बीनला सत्य कळायच्या आत सत्ता नाथच्या हातात आलेली असेल...(जवळजवळ जातो आहे...)

बीनः जय !...( ओरडते ) जय -- ( तो सुरा मारतो... ती अस्फुट किंचाळते. धडपडत चालायचा प्रयत्न करत मान उचलते,पडते. उठण्याचा प्रयत्न करते पण दरम्यान प्राण जातो.. जय एकदा प्रेताकडे पाहतो, मग निघतो -- जातो... शांततेत त्याची पावलं वाजतात... अंधार होत जातो... **वाटल्यास इथे मध्यांतर घ्यावे....** जरा वेळ निर्मितीदेवतेवर प्रकाश ... काही क्षणांनी तोफांचे आवाज. ही नाथच्या राज्यारोहणाची सलामी. राज्यरोहणाचे संगीत. नाथ मधून मधून हसत, वळून लोकांकडे पाहून हात हलवत, अभिनंदनाचा स्वीकार करत पायऱ्या चढतो आहे. अर्थातच सिंहासन प्रकाशात. नंतर एकदम सगळे आवाज थांबतात. आता मूकाभिनय. नाथ सिंहासनारूढ होतो. त्याच्या डाव्या हातावर अर्थातच अधिकारपदाचे रंगीबेरंगी वस्त्र. शेट येऊन डाव्या बाजूला पाहात उभी. सस्मित,तिच्या हातात पुष्पगुच्छ. चेहरा फार आनंदी नाही, पण सावरलेला. जय पुलावरून येऊन पाहात उभा. चेहरा जणू तटस्थ.बीन हताश, गलितगात्र होऊन उजव्या बाजूला खुर्चीवर बसलेली. नंतर नाथ उठून भाषण सुरू करतो. भाषण संपल्यावर आवाजहीन टाळ्या. तो बसल्यावर, शेट पुढे होऊन त्याला पुष्पगुच्छ देते. तो आनंदाने स्वीकारतो. नंतर जय येऊन त्याच्याशी हस्तांदोलन करतो. शुभेच्छा व्यक्त करतो. सहर्ष स्वीकार. या मूकदृश्याचे पार्श्वभागी नीलचे खालील गाणे --

मेण ओघळून गेले, माझे गुलाबाचे दैव
मन काटे काटे झाले, माझी मला येते कीव
जय माझा, जय होता, स्वर्ग माझा प्रेमी

माझी राख राख झाली, त्याच्या नरकाच्या होमी
मला हवे होते एक, छोटेसेच जग...छोटेसेच जग...
मोठ्या जगातून आला, माझा स्वप्नभंग
प्रियकर झाला माझा, मूर्तिमंत मृत्यू
माझ्या जीवनाचे सार, फक्त शून्य दीन कीव
मेण ओधळून गेले ...
मेण ओघळून गेले ....

नंतर दणक्यात समूहाच्या आवाजात राष्ट्रगीत - जणू वरील गाणे तुडवून टाकणारे. राष्ट्रगीत संपता संपता नाथ उठतो. पुन्हा लोकांना हात हलवून अभिवादन करीत जातो.जाताना शेटच्या कमरेभोवती हात टाकून तिला घेऊन जातो. जय विध्द नजरेनं पाहात उभा. इथे उत्कंठावर्धक संगीत...).

जयः ( स्वतःशीच ) हे नीलचं स्त्रीत्व आहे. नीलचं स्त्रीत्व आहे हे ...( तो असा विचारात उभा असतानाच हे दृश्य संपते. डाव्या बाजूने नाथ आणि शेट येतात. नाथच्या हातात तिचा हात.)

नाथः शेट - आता शेट नाही म्हणत मी तुला - अं ? शीला म्हणतो - शीला ! ( तिच्या गालावर टिचकी मारतो.)

शेटः तू म्हणशील तसं ! आता असं घडून आलंय तर तसंही चालेल. हेच बरं वाटतंय. स्त्री असणं कसं ऊबदार वाटतं - माझा पूर्वीचा विचार चुकीचाच होता. बहुतेक स्त्री असण्यात खूप मजा आहे.

नाथः ती मजा काही मला कळणार नाही, पण स्त्री असल्याची तुला जास्त मजा वाटेल हे मी पाहीन. जितका जास्त जास्त उपभोगेन मी तुला, तितकं तुझं स्त्रीत्व तीव्र होत जाईल - या भावनांच्या इतक्या दिवसांच्या दुष्काळामुळं स्त्रीत्व प्राप्त होताच तू स्त्री असूनही बीनला सोडून माझ्याकडे आलीस-- आणि सत्ताधारी व्यक्तीशी असा संबंध असावा ही इच्छा होतीच तुझी ! मी तुला माझ्याकडून तसं आश्वासनही दिलं होतं ! पण आपोआपच झालं सगळं ! अं !

शेटः ( लाजून ) हं ।

नाथः वा ! छान लाजलीस ! शील..शेट म्हणजे शील ...अं ?

शेटः अं ? ---

नाथः कसं वाटतंय ?

शीलाः ...चल ! ....

नाथः आता खूप फुलत जायला हवंस तू !

शीलाः हं.

नाथः सुंदर दिसतेस तूं ...

शीलाः हं...

नाथः अजून अंतर कशासाठी ? अं ?

शीलाः हं...

नाथः लांबूनच बरं वाटतं ?

शीलाः ( एकदम आलिंगन देऊन )... चल ! ( बाजूला होत ) चावट आहेस...!

नाथः बरं -- नंतर !

शीलाः हुं ...!

नाथः आता सगळा काळ आपलाच आहे. कसलाच धोका नाही. आता तू माझी झाली आहेस. जय माझाच पाठीराखा आहे. आणि नील तर आता अस्तित्वातच नाही. बीन एकटी पडलीय. तिलाही हळूहळू संपवून टाकीन मी. त्याबद्दलही विचार झालेला आहे माझा.

शीलाः गुप्त आहे वाटतं विचार ?

नाथः तुझ्यापासून काय गुप्त ठेवायचंय ? आता बीनच्या गैरकारभाराच्या चौकश्या सुरू करायच्या... अनेक आरोप ठेवत सुटायचं.. प्रश्नांच्या भडिमारानं चिंध्या करून टाकायच्या तिच्या..तिच्या राजवटीतल्या जुलुमाचं प्रायश्चित्त तिला मिळत असल्यासारखं ठेवायचं वातावरण...शीला, सत्ताधारी व्हायचं म्हणजे एक पथ्य पाळावं लागतंच, स्वतः कायम चारित्र्यवान आणि नीतिमान राहावं लागतं. सत्ताधारी हा लोकांना नेहमीच शांत, संयमी, सहनशील, धीराचा, आणि मुख्य म्हणजे न्यायी वाटावा लागतो... आपलं ते चित्र

बिघडू द्यायचं नाही.. खरं तर आहेच मी तसा --पण-- नीतिमत्ता आणि सत्ता समानार्थी असतात -- या तत्त्वाचाही उपयोग होईलच मला !

शीलाः धूर्त आहेस तू ! तुझा विजय होणं अटळच होतं !

नाथः सत्याचा नेहमीच विजय होतो आणि तो अटळच असतो. किती गुंतागुंतीची परिस्थिती आपोआप निर्माण होऊन सुटत गेली माझ्यासाठी ! बीनला सत्य दडवून टाकायचं होतं. पण माणसांहून मोठ्या शक्ती असतात. बीनला आपली सत्ता टिकवायची होती, म्हणूनच नीलला आपले प्राण गमवावे लागले. हुतात्मा व्हावं लागलं तिला - बीनच्या अत्याचारांशी संघर्ष करत. नीलचं एक स्मारक उभारायचा विचार आहे माझा. सत्यासाठी संघर्ष करण्याची कायम प्रेरणा देत राहील ते स्मारक !

शीलाः इतक्या सहज सुचतात तुला सगळ्या गोष्टी ! खरंच आश्चर्य वाटतं मला --

नाथः स्वार्थ नसला की, सगळं स्वच्छ दिसतं शीला !

शीलाः पण आपोआपच तुझा स्वार्थही साधला गेला. सत्ताही मिळाली आणि मीही मिळाले.

नाथः ( जवळ जात ) सत्तेचा मला लोभ नाही शीला --( तिच्या खांद्यावरून हात मागे टाकून तिच्या डोळ्यांत पाहात ) पण तू मिळालीस हे खरंच महत्त्वाचं आहे... अं ...( इथं हे दृश्य संपते .. आता उजव्या बाजूला बीन बसलेली. जय येतो.)

बीनः काय जय..कशा पध्दतीनं करताय सुरुवात छळाची ?

जयः नाथ उपभोगायला लागलाय आता नीलचं स्त्रीत्व...माझ्यामुळंच घडलंय हे. ती परिस्थितीच अशी होती की काहीही केलं असतं तरी चूकच झाली असती. माझी चूक आता लक्षात आलीय माझ्या.

बीनः ( त्याच्या बोलण्याला अजिबात महत्त्व न देता आणि आहारी न जाता...) अस्सं ! मी माझ्या छळाबद्दल विचारलं तुला.

जयः तुझ्या छळाचं नाथ पाहून घेईल. मला रस नाही त्यात. मला मदत हवी आहे तुझी.

बीनः माझा प्रमुख सल्लागार होतास तू !

जयः ते खरं नव्हतं बीन. तुलाही माहीत आहे ते .

बीनः आपले जवळचे संबंध होते अगदी.

जयः माझी चूक माझ्या लक्षात आल्यावर आता पुन्हा तूच जवळची आहेस मला बीन... मी अंतर देणार नाही तुला. तू मदत करणार आहेस की नाही तेवढं सांग.

बीनः मी कसली मदत करू शकणार तुला ? मला लौकरात लौकर कसं संपवायचं ते शिजत असेल आता. अर्थात त्याला भीत नाही मी. पण पध्दतीचा अंदाज आला की, मलाही काही गोष्टी सुचू लागतील.

जयः मी नाथच्या बाजूचा राहिलेलो नाही बीन. आता अशी जपून बोलू नकोस.

बीनः अरे वा ! मुख्य म्हणजे, सगळ्यात आधी तुझ्या नीलचं स्मारक उभारणार तो ! माझ्या दुष्टपणाचा बळी ठरलेली हुतात्मा म्हणून । तुझ्या प्रेयसीचा इतका सन्मान करणाऱ्या व्यक्तीविरुध्द उभा रहाणार तू ? फार क्रूरपणा होईल तो तुझा ! म्हणजे नीलवर तुझं प्रेमच नव्हतं असं म्हणतील लोक. कृतघ्न म्हणतील लोक तुला.

जयः मी माझा विरोध उघड करणार नाहीय बीन. पण तू मला एक वचन दिलंस तर मी तुझ्या बाजूनं लढायला तयार आहे.

बीनः बोल !

जयः तू मला शेट मिळवून द्यायचीस. मी तुझ्या विजयात सामील होईन. तू पुन्हा सत्ताधारी झालीस तर शेटही माझी असेल आणि तूही. तुम्हा दोन्ही स्त्रियांचा मी एकच पुरुष असेन. नाथ पुरुष असून नपुंसकाचं, संबंधहीन आयुष्य जगत सडून मेला पाहिजे.

बीनः म्हणजे याही परिस्थितीला दुसऱ्या काही शक्यता आहेत तर ! मला आता घालवण्यासारखं काही शिल्लकच नाही. संपूर्ण पराभूतच आहे मी. पण अजूनही ही शेवटची खेळी शिल्लक दिसतेय. कावेबाज, दुष्ट, क्रूर अशा त्या नाथला शेवटपर्यंत टक्कर द्यायची इच्छा आहेच माझी. मला सत्ता पुन्हा नाही मिळाली तरी चालेल. माझं निरपराधित्व फक्त सिध्द करायचंय मला. एखाद्या संतासारखा हसतो नाथ.. विजयी झालाय म्हणून करू शकतोय तो हे नाटक ...तुझा खरंच जर पाठिंबा असेल, तर त्याचं खरं स्वरूप उघडं पाडीन मी ..तू मागितलेल्या गोष्टी मला मान्य आहेत...मी तर आत्ताही तुझीच आहे...शेटलाही मिळवून देईन मी तुला... फक्त आता यातलं अक्षरही कुठं बोलू नकोस. आणि पुन्हा मला

भेटू नकोस... आज आला होतास ते फक्त बीन पराभूत झाल्यावर कशी दिसते ते बघायला, असं सांग सगळ्यांना...

जयः ठीक आहे. पण काही विचारविनिमयाची गरज भासली तर ?

बीनः विचारविनिमयाची गरज भासणार नाही.

जयः असं कसं म्हणतेस तू ? तुला धोक्याचे असे त्याचे काही मार्ग कळले तर ?

बीनः जय, मीही राजकारण जाणते. त्याचे मार्ग इतरांच्या लक्षात आले नाहीत तरी, मला पूर्ण अंदाज येईल. फक्त मला आलेले अंदाज योग्य वेळ आल्याशिवाय मला उघड करता येणार नाहीत इतकंच.

जयः ठीक आहे. जातो मी.

बीनः यशस्वी व्हायचं असेल तर, मनातली दडपणं काढून टाक आणि शांत राहा. मनातलं चेहऱ्यावर येऊ देऊ नकोस. ( त्याचा हात हातात घेऊन ) मी तुझीच आहे. आता पुन्हा आपली भेट उघड,हक्कानं आणि विजयानंतर ! ( जय तिच्याकडे क्षणभर पाहातो आणि जातो. आता नाथ सिंहासनावर. जय,शेट पाहताहेत. गर्दीचा आवाज. नाथ उभा राहतो आणि खालील भाषण करतो.)

नाथः मित्रांनो ! अधिकारसूत्रं औपचारिकरीत्या माझ्याकडे आहेत. पण खरे अधिकारी तुम्हीच आहात. तुमच्या सहभागाशिवाय कोणतीच सत्ता टिकणार नाही. तुमचा सहभाग नसेल तर, सत्ताधारी होतील हुकूमशहा ! अत्याचारी ! क्रूर । आणि सर्वांचे स्वातंत्र्य उद्ध्वस्त करणारे ! अर्थहीन होईल आपलं आयुष्य ! मी सुरुवातीलाच विनंती करतो, मला हुकूमशहा होऊ देऊ नका. तुमचा सहभाग आणि जागरूकता कायम ठेवा. बीनच्या राजवटीचा आपला अनुभव ताजाच आहे. त्याच्या जखमा भरून यायला कित्येक वर्षं लागतील. यातून आपण योग्य तो धडा घेतला पाहिजे. कुठलीही राजवट इतकी जुलुमी आणि इतकी हिंस्त्र होणार नाही याची सतत काळजी घ्यायला हवी आपण. परंतु मी एक आश्वासन देऊ इच्छितो आपल्याला--सत्तेसाठी जे काही क्रूर खेळ खेळले गेले आपल्या राज्यात, त्याची योग्य ती शिक्षा भोगावी लागेल याला जबाबदार असणाऱ्या व्यक्तीला. सर्व घटनांची निःपक्षपणे चौकशी केली जाईल आणि निर्णय घेतले जातील.न्यायाचं राज्य पुन्हा प्रस्थापित केलं जाईल. अन्यायाचा बीमोड केला जाईल. या गोष्टी मला जमत नाहीत असं मला वाटलं तर, मी स्वतःच सत्ता सोडून देईन. मला सत्तेचा लोभ नाही, पण जनतेचं हित करायला, काही अंमलबजावणी करायला सत्ता लागतेच. सत्तेचं याहून जास्त महत्त्व राहू नये, अशी माझी इच्छा आहे. कुणाचा सूड घेण्यात मला रस नाही, पण गुन्ह्याला शासन घडलं नाही तर, गुन्हेगारी बोकाळत जाईल. म्हणून योग्य त्या गोष्टी करणं भाग आहे. एका फारच मोठ्या भ्रमनिरासाच्या अनुभवातून आपण बाहेर येत आहोत. आता कुठल्याही व्यक्तीबद्दल भ्रमात राहू नका.व्यक्तीचं महत्त्व मानू नका. शेवटी सत्ता जनतेची आहे. कर्तेकरविते तुम्हीच आहात. याहून जास्त काय बोलू ? मी लौकरात लौकर माझी आश्वासनं पूर्ण करीन...(टाळ्या )आणखी एक म्हणजे, या क्रूर काळात नील हुतात्मा झालेली आहे. राजधानीतील मुख्य चौकात तिचा पुतळा उभारला जाईल,आणि तिचा मृत्युदिन हा राज्यात तिची पुण्यतिथी म्हणून सुट्टीचा दिवस राहील.(टाळ्या) तो पुतळा सतत आपल्याला स्वातंत्र्याची प्रेरणा देत राहील. जय तेजराज्य !( टाळ्या. सिंहासनावर बसतो. टाळ्या वाजत असतानाच दृश्य संपते. आता बीन आणि शेट पुलावरून विरुध्द दिशांनी जात असताना वाटेत भेटतात, थबकतात. शेट पुढे जाऊ लागते.)

बीनः शेट ! ( ती थांबते, वळते. ) मला तुझ्याशी बोलायचंय - ( शेट काही क्षण नुसतीच उभी. ) तुझी परवानगी असेल तर - ( आता शेट दोन पावले पुढे येते.) आपल्या ज्या संबंधांची आपली योजना होती ते संबंध अस्तित्वात येणं शक्यच नाही आता, पण त्याची निदान आठवण तरी ठेव एवढीच विनंती आहे माझी.

शेटः आठवण कशाला ठेवायची आता ?

बीनः तू आता स्त्री झाली आहेस. नाथची स्त्री झाली आहेस - हे ठीक आहे. माझं काही म्हणणं नाही. पण तुला त्याच्याबद्दल वाटणाऱ्या भावनांचं - आकर्षणाचं प्रदर्शन तरी करू नकोस--फार दुःख होतं मला. आधीच असंख्य चौकश्यांच्या कटकटींनी मला बेजार करताहात तुम्ही - हजारो मार्गांनी माझी बदनामी करताहात - त्यात आणखी तू तरी या दुःखाची भर घालून जखमांवर मीठ चोळू नकोस. मी पराभव मान्य केलेला आहे माझा. आता मी पुन्हा सत्तेवर येण्याची शक्यताच नाही. एकटी पडलेय मी. एके काळी, एकाच राजकीय गटात होतो आपण. कृपया त्याला थोडी तरी जाग -

शेटः माझं आणि नाथचं एकमेकांवर प्रेम आहे, त्याचं तुला दुःख होतं हा काही आमचा गुन्हा नाही. तूच जबाबदार आहेस त्याला. आमचे खाजगी संबंध कसे असावे याबद्दल, खरं तर तू विचार करू नयेस आता. तुझा प्रश्नच नाही तो. तुझं नशीब तू स्वतःच घडवत आली आहेत. तू विजयी झाली असतीस तर, तूही पर्वा केली नसतीस कशाची. आमचं सगळं रीतसर आहे, त्यात बदल करायची आवश्यकता वाटत नाही मला. नाथची राजवट खुलेपणानं चालणार आहे. तुला बचावाची संधी दिली जाईल. आता ती घ्यायची की नाही, किंवा कशी घ्यायची हा तुझा प्रश्न आहे. परंतु याहून जास्त अपेक्षा करू नकोस तू आमच्याकडून. आज माझ्याशी बोललीस ते जाऊ दे - पुन्हा मात्र भेटायचा, बोलायचा प्रयत्न करू नकोस - तुझ्या नशिबाला तूच जबाबदार आहेस.

( जाते. बीन क्षणभर उभी. मग तीही जाते. आता डाव्या हाताला नाथ आणि शेट म्हणजे शीला.)

नाथः बचाव द्यायचाच नाही म्हणतेय ती ! हे तर फारच उत्तम ! ही चालच इतकी हुशारीची आहे शीला, की बीननं काहीही केलं नं तरी ते चूकच ठरेल. बचाव द्यायला लागली तर, जाळ्यात सापडेल. आणि बचाव न देणं हा उद्दामपणा आणि कबुलीजबाब ठरेल. तिच्यावरचे आरोप सिध्द करणं सोपं होईल !

शीलाः मला भेटली होती ती. आपल्या प्रेमाचं प्रदर्शन करू नका म्हणत होती. तुझी न् माझी घसट बघून दुःख होतं म्हणे तिला !

नाथः उत्तम ! आपण यापुढे जास्तच प्रदर्शन करायचं. तिला सर्व तऱ्हेच्या अडचणी,दुःख,मानहानी आणि त्रासाचे प्रसंग यांत गुंतवत जायचं - आपोआप खलास होत जाईल ती ! तिच्यासमोर तर मी, हक्कानं जवळ घेईनच तुला, पण इतरही ठिकाणी थोडंफार असंच वागायचं. चारचौघांकडूनही हेच कळत राहिलं पाहिजे तिला. सत्तेवर आली तेव्हा कशी गोड हसत होती ! आम्हालाही तसं हसता येतं !

शीलाः नवे डाव टाकायला अवसरच द्यायचा नाही तिला !

नाथः डाव टाकणार कुठे ! जागा कुठं आहे ? ( जय येतो.) ये जय. कसं काय ?

जयः ठीक आहे.

शीलाः काय म्हणतेय बीन ? तू गेला होतास वाटतं तिच्याकडे ?

जयः होय. गेलो होतो. आता पराभूत झाल्यावर आणि तिचे गुन्हे चव्हाटयावर आल्यानंतर - म्हटलं बघू कशी काय दिसतेय ते !

नाथः ( स्मित ) बरं, कशी दिसतेय ?

जयः तशी काही ती खचलेली वगैरे वाटत नाही. पण पुन्हा सत्ता मिळण्याची आशा सोडलेली दिसतेय तिनं. बहुतेक ती प्रयत्नसुध्दा करणार नाही.

नाथः ( शेटला जवळ घेऊन ) आणि माझ्या या शीलाबद्दल काय म्हणत होती ? ही तर अगदी जवळची होती तिच्या !

जयः ( राग न दाखवता ) काही नाही. हे असं घडायला नको होतं एवढंच म्हणाली.

नाथः ते म्हणणारच ती ! ती दुःखी होऊन बाकी सगळे सुखी होतील ना ! एक नंबरची स्वार्थी आणि अहंकारी आहे ती, ढोंगी नंबर एक !

जयः उगीचच गेलो असं झालं मला.

नाथः का ?

जयः नाही म्हटलं तरी जरा भीतीदायकच आहे ती ! पुन्हा काही आपण फिरकणार नाही तिकडे !

( नाथ मोठ्यांदा हसतो.)

शीलाः एवढं हसण्यासारखं काय आहे त्यात ?

नाथः हेच ! तिच्या राज्यात लोकांची व्यक्तिमत्वंच चिरडली जातील असं मी केव्हापासून म्हणत होतो ! हे सत्य पटायला लागलंय आता लोकांना ! ठीक आहे.उशिरा का असेना, सत्यच मान्यता पावलं ! आता ही शीला, तू आणि मी एक आहोत. तिच्या दुष्ट शक्तींना वावच राहणार नाही.

जयः नीलच्या स्मारकाची कल्पना फार आवडली मला. तिच्या योग्यतेचं आणि त्यागाचं चीज होईल !

नाथः खरं आहे जय ! तू स्वार्थासाठी तिचा खून केलास हे जाहीर झालं असतं, तर तिला हे महत्त्व नसतं मिळालं. तुझं पुरुषत्वही संपलं जाणार आहे हे कळताच, तिनं स्वतःच आपल्या स्त्रीत्वाचा त्याग करून तुला वाचवलं !-- आणि नंतर आत्महत्या केली -- असं म्हटल्यानं कसं, तिचंही महत्त्व वाढलं आणि तूही मुक्त राहिलास खुनाच्या आरोपातून.

जयः नीलला तिचा अंदाजच आला नव्हता --

नाथः खरं तर, नील माझ्या बाजूला असायला हवी होती. पण हरकत नाही; तिचं स्त्रीत्व तरी आता या शीलातून माझ्याबरोबर आहे. शीलाची निवडही यावेळी बरोबर आहे ! नीतीच्या बाजूला आहे ती ! नीलच्या आत्म्याला आनंदच वाटेल याचा !

जयः बरं, मी जातो.

नाथः ठीक आहे, तू मघाशी म्हणालास ते बरोबर आहे. बीनला आपण कुणीही भेटायबिटायचं नाही. एकाकीच पाडायचं तिला.

जयः हं. हो - ( जातो. नाथ शीलाच्या गालाला बारीक चिमटा काढून लाडानं " माझी राणी ! " म्हणतो, इथे हे दृश्य संपते. आता प्रकाशवर्तुळात जय एकटा.)

जयः मी खुनी आहे नील, खुनी आहे. खून केलाय मी तुझा. जगाला ओरडून सांगेन मी नील. मी खून केलाय नीलचा...शिक्षा करा मला... पण नील, मला माझ्या गुन्ह्याची शिक्षा भोगायचीय म्हणून, तुझ्या मृत्यूची भव्यता मी कशी कमी करू ? आणि सत्य महत्त्वाचं आहे की, आपलं पुनर्मीलन ? पुनर्मीलनच ! बीनला वाईट ठरवून चालणार नाही. मी खुनी ठरून चालणार नाही. तू नाहीयस आता नील...आहे ते फक्त तुझं स्त्रीत्व...माझा हक्क नसलेलं तुझं स्त्रीत्व ! मला माझं पुरुषत्व गमवायचं नव्हतं नील, म्हणूनच गमावून बसलो मी तुला... फक्त माझाच हक्क मानत होतीस तू तुझ्यावर...तुझं प्रेम होतं माझ्यावर...आणि आता...आता बलात्कार होतायत तुझ्या स्त्रीत्वावर नील... बलात्कार होताहेत...आणि मी...मी उघड्या डोळ्यांनी नुसता पाहात राहिलोय...माझ्यामुळंच घडलंय हे सगळं,माझ्यामुळंच...तडफड होतेय माझी नील... छळ होतोय नुसता मनाचा...कदाचित...कदाचित हीच शिक्षा मिळतेय मला...तुझ्या खुनाची शिक्षा भोगतोय मी नील...आता पश्चात्ताप करून काही उपयोग नाही...काहीच उपयोग नाही...( थकून बसून राहतो.) बीन यशस्वी झाली तर, करताही येईल कदाचित् परिमार्जन याचं...शेट मला मिळाली तर तिच्यातलं तुझं स्त्रीत्व फुलासारखं सांभाळेन मी. नील...खरंच...फक्त तिला यश मिळायला हवंय...
( स्वस्थ बसून राहतो. इथे हे दृश्य संपते..आता शीला फुलदाणीत फुलं लावण्यात मग्न. चेहरा प्रुफुल्लित. नाथ घाईनं येतो.)

नाथः शीला,शीला, महत्त्वाची बातमी आहे. बीननं भेटीची परवानगी मागितली आहे. परवानगी दिलीय मी तिला. थोड्याच वेळात येईल ती. काहीतरी महत्त्वाचं घडणार आता.

शीलाः असं ?

नाथः जयला निरोप पाठव. या भेटीच्या वेळी आपली माणसं हजर असावीत.

शीलाः ठीक आहे. आलेच.( जाते. पुन्हा जरा वेळाने परत येते.) कशासाठी येत असेल ती ?

नाथः तसा अंदाज करणं चूक ठरेल. सावध राहावं लागेल. तशी सोपी नाही ती.

शीलाः मला वाटतं विनवण्या करायला येतेय ती. या त्रासानं कंटाळून गेली असेल ती. शिवाय पुन्हा उभं राहण्याची सुतराम शक्यता नाही.

नाथः खुळी आहेस. खरं तर आत्महत्या करावी अशा परिस्थितीत आहे ती. ती जिवंत राहते आहे याचा अर्थच --

शीलाः काय अर्थ याचा ?

नाथः कदाचित ती भेटून गेल्यानंतर अधिक बरोबर अंदाज येईल मला.

शीलाः काय ठरवलंयस तू ? समजा, तुझ्या कोणत्याही अटी मानायला ती तयार झाली तर, मुक्त करशील तिला तू या त्रासातून ? चौकश्या आणि बदनामीच्या ?

नाथः तसं कसं होईल शीला ? तिनं माझा व्यक्तिगत अपराध केलेला असता तर, क्षमा करणं हा माझा निर्णय ठरला असता, पण संपूर्ण जनतेचाच अपराध केलाय तिनं. या अपराधाची क्षमा करायचा मला अधिकार नाही. पण हे कशाला आता ? प्रत्यक्ष ती काय बोलतेय ते आधी पाहू. कुठलाच विषय आपण काढायचा नाही. तिलाच जास्त बोलू द्यायचं.( जय घाईनं येतो.)

जयः काय झालं नाथ ? इतक्या तातडीनं बोलावलंस ?

नाथः बीन येतेय भेटायला.

जयः असं ?

नाथः बस, हा महत्त्वाचा प्रसंग आहे. मी नुसतं तिचं म्हणणं ऐकून घेणार आहे.

जयः ( बसत ) तुला कशाला भेटायला येतेय ती ?

नाथः ते अंदाज नकोत. प्रत्यक्षच पाहू; तू सावध राहा. तिचा प्रत्येक शब्द नीट ऐकून ठेव. या तिच्या भेटीचा नीट अर्थ लावावा लागेल आपल्याला. तिचं प्रत्येक बोलणं नीट लक्षात घ्यायला हवं. आणि तिच्या या भेटीचा उद्देश जर नाही समजला आपल्याला तर ती...तशी धोक्याची आहे ती ...

जयः आता कसला आलाय तिचा धोका !

शीलाः नाही, पण तिचा कोणताच प्रयत्न नसेल हे मलाही खरं वाटणार नाही. जपून राहावंच लागेल...मला वाटतं, आली ती ...( दारापर्यंत जाऊन येते.) येतेय ती ...यायला लागलीय...

( काही क्षण...बीन येते. कष्टानं आणि मनस्तापानं थकलेली दिसतेय...तरीही एक थंड शांतपणा...)

नाथः ये बीन ! बस !

बीनः नमस्कार --

तिघेहीः नमस्कार.

बीनःः जय, तूही आहेस वाटतं !

जयः म्हणजे तुला एकटया नाथशीच बोलायचं असेल तर --

बीनः नाही,नाही. तसं काही नाही. आता तसं गुप्त काय असायचंय ? बरं झालं-- तुम्ही तिघंही आहात !

शीलाः तू स्वतःहून भेटायला आलीस हे आश्चर्यच आहे.

बीनः आश्चर्य वाटण्यासारखं नाही हे. खरं तर, नाथला हे अपेक्षितच असेल. मी आलेय ती फक्त एवढ्याचसाठी -- एकतर माझी सत्ता गेलेली आहे. मला कुणाचा पाठिंबाही राहिलेला नाही. माझी पुरेशी बदनामीही झालेली आहे. पुन्हा सत्तेची आशाही करायला वाव राहिलेला नाही मला. मला इच्छाही नाही आता. हा त्रास आणि ही दडपणं पेलेनाशी झाली आहेत मला. उरलेलं आयुष्य कुठल्यातरी अज्ञात कोपऱ्यात निवांतपणे जगून संपवायचीच फक्त इच्छा करू शकते मी. अशा परिस्थितीत, माझा छळ करत राहून काय मिळणार आहे तुम्हाला ? तुमचं उद्दिष्ट साध्य झाल्यानंतर कशाला चालू ठेवायचं हे सगळं ? मला द्यायची ती शिक्षा ठोठावून तरी मोकळे व्हा. पण तुम्ही नुसताच मला मनस्ताप देत राहिला आहात ! माझं प्रकरण क्षमाशीलपणे निकालात काढलंत, तर तो क्षण आणि तुमचीही प्रतिमा अधिक उजळ होऊन, तुमच्या चांगुलपणात आणि मोठेपणात भर पडेल. सगळं इतकं सरळ असताना, व्यक्तिव्देषानं तुम्ही हा नरक चालू ठेवू नये अशी विनंती आहे माझी.

नाथः बीन, राजकीय कृती आणि तिचे फायदेतोटे हे तुझ्याकडून शिकायची गरज वाटत नाही मला. राजकारणात तुला फार काही समजतं असं मला वाटत नाही. नशिबानं कधी काळी तू यशस्वी झाली होतीस इतकंच ! ते असो. दुसरं, व्यक्तिव्देषाचं...हे सगळं व्यक्तिव्देषानं चाललंय हा तुझा भ्रम आहे. स्वतःला सोयीस्कर अशा भ्रमात राहणं ही तुझी जुनी सवय आहे. संपूर्ण जनतेचाच विश्वासघात झाला आहे तुझ्याकडून. तर रीतसर आणि न्याय्य चौकशी होणं अटळच आहे. आणि याची शिक्षा भोगावीच लागेल तुला. तुझा व्देष करत बसायला वेळ नाही मला. दुसरी खूप महत्त्वाची कामं आहेत.

बीनः मी माझा संपूर्ण आणि कायमचा पराभव मान्य केलेला आहे. आणि आता फक्त क्षमायाचनाच करू शकतेय मी. एवढी माहितीच फक्त द्यायची होती मला. दुसरा काहीच उद्देश नाही या भेटीचा.

नाथः ठीक आहे. विचार करीन मी. पण हा माझा व्यक्तिगत प्रश्न नाही. तुला अपेक्षित ते मी करू शकलो नाही, तर कृपया तो तुझा व्देष समजू नकोस. तसं तुला वाटत राहाणं हा माझ्या सरळपणाचा आणि प्रामाणिकपणाचा अपमान होईल. सत्ताधाऱ्यांच्या लहरीचं राज्य मानत नाही मी. न्यायाची, मोकळी आणि स्वच्छ राजवट आहे माझी. मी स्वतःला व्यक्ती म्हणून नगण्य समजतो. मी निमित्तमात्र आहे.

बीनः ठीक आहे. याचा अर्थ समजू शकते मी. क्षमायाचनेच्या पायरीपर्यंत खाली आले आहेच मी ! काहीही सहन करीन.

नाथः निर्मितीदेवतेची इच्छा ! मी कोणतेच अंदाज करू इच्छित नाही.

बीनः माझी बाजू मी स्पष्ट केली आहे. तरीही काही घडतच राहणार असेल तर, सहन करत राहण्याशिवाय मार्गच नाही.( उठत ) बरंय. जाते मी.

नाथः ठीक आहे, दुर्दैवी आहेस तू. सहानुभूती वाटते मला. शीलालाही ! अरे हो ! ते माहीत नसेल तुला. हिचं नाव आता शेट नाही - शीला आहे.( लाडानं शीलाचा हात हातात घेतो,हाताचं चुबन घेतो. बीन व्यथित झालेली दिसते.जय जणू तटस्थ.)

बीनः अभिनंदन शीला ! भेट घेऊ दिल्याद्दिल आभारी आहे मी. नमस्कार !( जाते.काही क्षण शांतता.)

नाथः अगदीच सोपा डाव होता तिचा. दयाबुध्दीनं आपण तिची चौकशी सोडून दिली की, काही वर्षांनी पुन्हा डोकं वर काढायचं ! त्यावेळी काही मग पुन्हा ही प्रकरणं काढता येणार नाहीत आपल्याला. मग कुठल्याही प्रामाणिक विरोधकासारखं संधीची वाट पाहात राहता आलं असतं तिला ! तिची संपूर्ण बदनामी आणि तिच्या राजकीय अस्तित्वाचा शेवट, झाला तर आत्ताच होऊ शकेल. पुढं कधीतरी नाही. त्यामुळं क्षमायाचना करून हा जवळचा क्षण टाळायचा प्रयत्न होता तिचा. मूर्ख आहे ती. तुला काय वाटतं जय ?

जयः बरोबर आहे तुझं. विशेष काहीच नव्हतं.

शीलाः ( नाथला -- ) खरंच, फार मोठा आहेस तू -- ( त्याच्या हाताचं चुंबन घेऊन--.) किती सहज हाताळलंस तू तिला ! ( जय अस्वस्थ.)

जयः बरं, जातो मी.

नाथः हं ! हालचालींवर लक्ष राहू दे तिच्या !

जयः हं. बरंय -( जातो.)

शीलाः तुझ्याबद्दल इतका आदर दाटून आलाय मनात !

नाथः तो आता मला कळणार तो तुझ्या शरीरातूनच ! तुझा टंच आदर चाखणार मी आज मनसोक्त।

शीलाः चावट आहेस ! ( लाजते. इथे हे दृश्य संपते. आता प्रकाशवर्तुळात जय, हातात सिगरेट, येरझाऱ्या घालतो आहे. अर्थात अस्वस्थ,डोक्यात कल्लोळ. हे दृश्य एवढेच. उजव्या बाजूला बीन काहीतरी वाचत बसलेली. डाव्या हाताला नाथ कसल्यातरी फाईली बघत बसलेला. या तीन दृश्यांवर आलटून पालटून प्रकाश. मग नाथच्या दृश्यावर प्रकाश स्थिरावतो.जय येतो.)

नाथः ये जय ! काय आता - या वेळी !

जयः मला काही बोलायचं होतं तुझ्याशी. शीला कुठं आहे ?

नाथः आत आहे ती. झोपली असेल नुकतीच.

जयः ठीक आहे. पण तुझ्याशीच बोलायचंय फक्त.

नाथः बोल, काय विशेष ?

जयः बीनबद्दलचा माझा संताप वाढत चाललाय...असह्य होतं कधीकधी...तिचा खून करावा असं वाटतं...तिच्यामुळं माझी नील नष्ट झाली !...

नाथः छे...छे...छे...छे...छे...! असलं काही करू नकोस. विनाकारण आपण खुनी आणि अत्याचारी कशाला ठरायचं ? तिच्या मरणानं मरतीय की ती ! आणि खुनाचं दुसरं एक वाईट असतं. तेच शस्त्र आपल्यावरही उलटू शकतं. खुनाचं सत्रच सुरू होण्याची शक्यता असते. असलं काहीही करायचं नाही. खून न करता मारता आली पाहिजेत माणसं ...

जयः पण माझ्या संतापाला वाटच मिळत नाहीय...

नाथः तू नुसता मला साथ देत रहा...तुला हवं तेच घडवतोय मी ...

जयः मला तू खूनाची परवानगी दिलीस तर बरं होईल. तुझाही एक धोका कायमचा निकालात निघेल...

नाथः अरे, संतापल्यावर हा मार्ग तर प्रथम सुचतो...पण तो संतापाच्या भरात सुचलेला मार्ग असतो. लोकराज्यात हे अजिबात उपयोगाचं नाही... याचे दूरगामी परिणाम आपल्यालाच घातक होतात. आपण चांगले आणि सत्प्रवृत्त आहोत असं दिसत राहिल्याशिवाय, टिकाव लागत नसतो लोकराज्यात...

जयः ( उठून येरझाऱ्यांप्रमाणे चालत -- ) आज दुपारी तिला इथं पाहिल्यापासून डोकं भडकलंय माझं ...असं वाटतंय की ...काय वाट्टेल ते होवो...( तो चालतच राहतो...नाथ त्याच्याकडे न पाहता बोलत राहतो...)

नाथः समज तू हे केलंस -- अं--तर ते मी करवलं असं होणार -- साहजिकच--म्हणजे नेता म्हणून संपलोच मी ..आणि सगळ्यांचं हित पाह्यचं असेल तर, सत्ता सांभाळायला नको का आपल्याला ? आणि सध्याच्या परिस्थितीत तर हे असलं काही करणं अगदीच अनावश्यक आहे...परिस्थिती पूर्णपणे आपल्याला अनुकूल आहे...( इथे जय सुरा काढतो, आणि अचानक चपळाईनं नाथच्या मानेखाली खुपसतो, नाथचा अस्पष्ट आवाज--धडपडतो,उभा राहतो--पडतो-विव्हळतो-मग निपचीत होतो...जय जरा वेळ पाहतो...आतल्या बाजूच्या दाराच्या दिशेला जातो...)

जयः शीला S ए शीला S...( काहीक्षण ) शी S ला S S...

शीलाः ( आतून ) ओ ऽ - आले - ( ती आल्याबरोबर जय तिला बाजूला घेतो--.)

जय : ( तिला बाजूला घेत ) इकडे या बाजूला ये ...तोंडातून आवाज येऊ देऊ नकोस...मी काय सांगतोय ते ऐक नुसतं...तुला माझ्यामुळं तुझं स्त्रीत्व...

शीलाः ( घाईत - खालच्या आवाजात )अरे हो - पण झालंय काय ? इतका घाईत अन् अस्वस्थ का तू !

जयः तेच सांगतोय, ऐक फक्त. तुझं हित लक्षात घेऊन वाग. नीलचं स्त्रीत्व तुझ्यात आहे. नील फक्त माझाच हक्क मानत होती तिच्यावर - सगळं लक्षात घे. बदल अटळ आहे. भावनेच्या आहारी जाण्यासारखं काही नाही. उपयोग नाही त्याचा. बीनला चांगलं म्हणावं लागेल आता. नाथला वाईट म्हणावं लागेल.

शीलाः का ? काय झालंय ? नाथ कुठंय ?( बाहेरच्या दालनाकडे जाऊ लागते, जय तिला अडवतो.)

जयः गडबड करू नकोस. नाथ अत्याचारी होता,स्वार्थी होता, क्रूर होता. त्याला भिऊन आपण गप्प होतो. खऱ्या गोष्टी कशा घडल्या हे उघड करावं लागेल आता. सांगावं लागेल लोकांना.

शीलाः अरे पण, हे काय अचानक...काय झालंय काय...नाथ काय करतोय ?

जयः ( कोरडेपणाने ) मी खून केलाय त्याचा -

शीलाः ( दचकून ) काय ?- तू- खू ऽ न !( झटकन् बाहेर जाऊ लागते - जय पुन्हा आडवतो.)

जयः ओरडू नकोस. परिस्थितीतला बदल लक्षात घे. आता बीन पुन्हा राज्यावर येणं हेच आपल्या हिताचं आहे. आश्चर्याच्या भरात चूक करू नकोस. बीन पार खचून गेली, म्हणून हे करावं लागलं मला. नीलचं स्त्रीत्व नाथकडे राहणं मान्य नव्हतं मला. सविस्तर नंतर सांगेन. गोंधळून वागू नकोस, शांत रहा. मी बीनकडे जाऊन येतोय, तोवर कुणालाही हे कळता कामा नये.( जय बाजूला होताच ती झटकन् बाहेर येते. जय डाव्या कडेला उभा. शीला या अचानक धक्क्यानं घाबरलेली...प्रेताजवळ जावं न जावं- स्पर्श करावा न करावा या गोंधळात ती उभी...मधेच जयकडे पाहते...)

जयः आलोच मी ...दार लावून घे...( जातो. इथे हे दृश्य संपते. आता बीन. घाईघाईने जय येतो. )

जयः बीन, मी खून केलाय नाथचा --

बीनः ( अविचलित ) हं !

जयः तुला आश्चर्य नाही वाटलं ! धक्का नाही बसला ? तू फारच खचून गेलीस म्हणून हे करावं लागं मला.

बीनः हे अपेक्षितच होतं मला. आजच घडेल असं मात्र वाटलं नव्हतं.

जयः म्हणजे ? तुला कसं कळलं -- असं कसं वाटलं -?

बीनः जय, मला करता येण्यासारखं काहीच नव्हतं. खचून जाणं आणि पराभवाचं प्रदर्शन करणं हा एकच डाव माझ्या हातात होता. नीलचं स्त्रीत्व शेटमार्फत नाथ उपभोगत असल्यामुळं तू नाथबद्दलच्या व्देषानं बोलत होतास. ते खरं असलं तर, तुला हेच करावं असं वाटायला लावण्याचा हाच मार्ग होता- मी संपूर्ण पराभूत होणं. असो. ते बाकीचं जाऊ दे. शेटला कळलंय का हे ?

जयः शीलाला मी नीट पटवून आलोय. ती नीट वागली असेल तर ठीकच. पण दोन्ही शक्यता लक्षात घेऊन भराभर हालचाली केल्या पाहिजेत.

बीनः ती जर समजूतदारपणे वागत असेल तर, त्याचा खून झालाय हे जाहीर होऊ द्यायचं नाही. खुनामुळं राज्यात हिंसाचार माजेल कदाचित आणि सत्यापेक्षा राज्याचं हित महत्त्वाचं आहे. आणि तू त्याचा खून केलायस असं जर ती ओरडत सुटली, तर नाथच्या क्रूरपणाचं, अत्याचाराचं आणि भयानकपणाचं वर्णन तू तयार ठेव. त्याच्या कोणत्या वागण्यामुळं आणि कोणत्या निर्णयामुळं जनतेचं कसं अतोनात नुकसान होणार होतं ते जरा कल्पना लढवून तयार करून ठेव. त्याला मी सत्यता देईन नंतर... शक्यतो मी हळहळ व्यक्त करावी, झालं हे फार वाईट झालं असं म्हणावं, सत्तेत अजिबात रस नसल्याचं दाखवावं आणि केवळ तात्पुरती म्हणून सर्वांच्या आग्रहाखातर सत्ता स्वीकारावी - हे ठीक होईल. कुठल्याही परिस्थितीत हे शक्य आहे. शेट जर शहाणपणानं वागत असेल तर, नाथचा मृत्यू हृदयक्रिया बंद पडून झालेला असेल, नाहीतर त्याच्या भयानक धोरणांनी संतापून तू त्याचा खून केलेला असशील. तू पुढे हो, मृत्यूची बातमी माझ्यापर्यंत येईल तेव्हा मी येईन. भिऊ नकोस. आता परिस्थिती मी हाताळणार आहे. सगळं चांगलंच होईल.( जय अवाक् पाहात उभा..) जा लौकर.( जय जातो. इथे हे दृश्य संपते.आता सिंहासनावर प्रकाश. बीनचे सत्ताग्रहण. डाव्या दंडावर अधिकारपदाचे रंगीबेरंगी वस्त्र. आता संगीत नाही. बीन सिंहासनापन्न झाल्यानंतर फक्त तोफांचे आवाज. शेट आणि जय यांच्या सौम्य टाळ्या. चेहरे गंभीर. शेट पुष्पगुच्छ नेऊन देते. जय हस्तांदालन करून येतो. नंतर बीन उभी राहते.)

बीनः (गंभीर स्वरात ) हृदयक्रिया बंद पडून नाथचा मृत्यू झाला- त्यामुळं, नाइलाजानं, केवळ काही काळापुरतीच ही अधिकारसूत्रं मी स्वीकारते आहे. नाथ आणि मी राजकीय विरोधक होतो, पण एक व्यक्ती म्हणून मला आदर होता त्याच्यावद्दल. राजकीय डावपेच म्हणून माझ्या बदनामीचे अनेक प्रकार झाले....परंतु ते लक्षात ठेवावे असं वाटत नाही मला... मी तात्पुरतीच असेन या अधिकारपदावर. नंतर एखादी दुसरी व्यक्ती भूषवील हे स्थान... मी दोषी ठरले सत्य उघड झाल्यावर, तर शिक्षाही भोगेन मी ...आणि नाही ठरले मी दोषी, तरीही, मरणानंतर वैर संपतं असं म्हणतात-- त्याप्रमाणे नाथच्या कारवाया आपण विसरून जाऊ-- अशीच विनंती करेन मी सर्वांना. तो कसाही असला तरी राज्यभक्त होता. एक कर्तबगार राज्यभक्त होता. त्यानं काही चांगल्याही गोष्टी केलेल्या आहेत. तेव्हा खऱ्या-खोटयाचे, चांगल्यावाईटाचे निर्णय आपण काळावर सोपवू आणि कामाला लागू. खूप प्रश्न आहेत.....खूप आव्हानं आहेत... एखाद्या व्यक्तीचे गुणदोष, चुका - हे सर्व कायम उगाळत बसण्यात अर्थ नाही. नाथचा गट आणि माझा गट हे वैर आता संपलं आहे असं मी मानते. ( टाळ्या.) आणि आता एक आनंदाची बातमी ! मी इथं येण्यापूर्वीच मला कळलं की राज्यात सहा नवीन व्यक्तींवर निर्मिती देवतेचा कृपाप्रसाद बरसलेला आहे. तीन पुरुष,दोन स्त्रिया आणि एक नपुंसक यांच्या शरीरांवर हिरवी चक्रं उमटलेली आहेत ! आपण त्यांचं या नव्या रूपात हार्दिक स्वागत करू या आणि आपल्या राज्याच्या हितासाठी झटण्यात या सर्व व्यक्ती यशस्वी होवोत अशा शुभेच्छा व्यक्त करू या ! शेवटी आपण एक आहोत, निर्मिती देवतेच्या इच्छेनं सगळं चांगलंच होईल.जय तेजराज्य !( टाळ्या...राष्ट्रगीत...बीन समोरच्या गर्दीवर फुलं उधळते...पायऱ्या उतरते. जय आणि शेट दोन्ही बाजूंनी जवळ येतात. इथे हे दृश्य संपते... आता डाव्या हाताला बीन, जय आणि शेट. शेट खुर्चीवर बसते. )

बीनः अवघड होतं सगळं, पण -- पार पडलं.

जयः अशक्य वाटत होतं सगळं -- विश्वासच बसत नाही अजून. तुझ्यावर खरंच कृपा आहे निर्मितीदेवतेची ! इतके कठीण प्रसंग तू इतक्या सहजपणानं आणि खरेपणानं हाताळू शकतेस !

बीनः असेलही कदाचित कृपा निर्मितीदेवतेची. शेवटी राज्याच्या हितासाठीच झटणार आहे मी .

जयः सगळंच छान सांधून घेतलंस तूं ! तुझं भाषण तर --( शेट हुंदका देते. रडू लागते.),ए, काय झालं ? शीला !( जवळ जाऊन ) काय झालं ? रडतेयस काय अशी - हे बघ -- ए ...

शीलाः ( रडतच ) मी आई होणार आहे -- नाथच्या मुलाची ...( हुंदके देत राहते...बीन पाहात राहते.. जयचा हात शेटच्या खांद्यावर...) नाथच्या मुलाची आई होणार आहे मी... (रडतच राहते...या दृश्यावरचा प्रकाश कमी कमी होत जाऊन निर्मितीदेवतेच्या मूर्तीवर प्रकाश पडत जातो...पडदा पडत जातो....)

**समाप्त**



पत्ता :- चं.प्र.देशपांडे,
३, स्नेहदीप अपा.,
चिंतामणीनगर, वीर सावरकर पथ,
सहकारनगर नं.२, पर्वती,
पुणे - ४११००९

**दूरध्वनी :- २४२२ ७८४७. / २४२२७८४८. / ९३७१००५७७३.**